रोग्यास कॉलऱ्याप्रमाणें जुलाब होत आहेत असें सांगू लागला ! शास्त्रीबोवांना तें ऐकून नवलच वाटलें. ते म्हणाले, माझ्या औषधानें कदाचित् गुण येणार नाहीं. पण असा अपाय होण्याचा मुळींच संभव नाहीं. ते तसेच रात्रीं रोग्यास पाहण्यास गेले. त्याची स्थिति खरोखरीच चिंताजनक झाली होती ! शास्त्रीबोवांनीं काढ्याच्या पुड्या गांध्याकडून आणलेल्या पाहण्यास मागितल्या, तों गांध्याच्या अज्ञानामुळें किंवा हलगर्जीपणामुळें काढ्याच्या याद्रींत पटोल होतें, तेथें कडुपडवळ गांध्यानें घातलें होतें. ती चूक शास्त्रीबोवांच्या लक्षांत येतांच त्यांनीं ताबडतोब योग्य तो उतारा दिला व रोगी सुदैवानें बचला गेला. या प्रसंगामुळें शास्त्रीबोवांनीं ठरविलें कीं रानांतून वनस्पति आपणच आणवून आपण आपल्या माहितीनें काढ्याच्या पुड्या व इतर औषधि तयार करून बाव्या. त्यानंतर ते मालडुंगें वगैरे रानांतून वनौषधि आणवूं लागले.

त्याचप्रमाणें सखारामशास्त्रीहि मधून मधून कोकणांत जाऊन तेथें कांहीं रसायनांना निवडक वनस्पतींचीं पुटें देऊन आणीत व तेथून गुळवेळसत्वहि आणीत. तीं औषधें ते कृष्णशास्त्री यांस देत व त्याच्या मोबदल्यांत दुसरीं रसायनें वगैरे औषधें धंद्याकरितां घेत. या औषधांशिवाय कृष्णशास्त्री त्यांस कांहीं पैसेहि देत असत. या प्रकारें कृष्णशास्त्री हे सखारामशास्त्री यांच्या सहकारितेनें वैद्यकी करूं लागले, तसतशी त्यांची आर्थिक स्थिति लवकरच सुधारत गेली. सन १८७२ च्या १० नवंबरच्या ठाण्याचे अरुणोदयाचे अंकांत कृष्णशास्त्री यांनीं प्रथमच आपल्या औषधांची जाहिरात दिली ती अशी—

## औषधें

"आम्ही खालीं सही करणार सर्व लोकांस विनयपूर्वक कळवितों कीं वैद्यशास्त्राप्रमाणें खालीं लिहिलेलीं औषधें तयार करून स्वल्प

किंमतीनें सर्वांस मिळावीं याकरितां विक्रीस ठेविलीं आहेत. तर ज्यास पाहिजे असतील त्यांनीं पनवेल येथें आम्हाकडे अथवा ठाणें येथें अरुणोदय छापखान्याचे मालक यांजकडे किंवा मुंबईत शेतआळी सातव्या गल्लींत नं. ८५ चे घरांत जनार्दन नारायण पुराणिक यांचे-कडे किंमत पाठविली असतां मिळतील. खालीं किंमती लिहिल्या आहेत; त्या खेरीज टपाल खर्च निराळा पडेल." यापुढें औषधांची किंमतवार यादी दिली असून कोणतें औषध कोणत्या रोगांवर आहे हेंहि त्रोटक रीतीनें दाखविलें आहे. व जाहिरातीखालीं सही सखाराम कृष्णशास्त्री राहाणार पनवेल अशी आहे. सखारामशास्त्री यांच्या वडिलांचें नांव रामकृष्ण भट असें होतें. अर्थात् वरील नांव एका व्यक्तीचें नसून सखारामशास्त्री व कृष्णशास्त्री हीं दोन नावें सहींत एकत्र केलीं आहेत. यावेळीं औषधांची एवढी विस्तृत जाहिरात वर्तमानपत्रांत यांच्याशिवाय कोणाचीच नसे. यांची जाहिरात अरु-णोदयांत सतत होती.

त्यानंतर शके १८०२ सालच्या जाहिरातीखालीं सखारामशास्त्री व कृष्णशास्त्री अशा सह्या आहेत. व त्याही पुढें कांहीं वर्षांनीं सखारामशास्त्री यांचें नांव कमी होऊन एकट्या कृष्णशास्त्री यांचेच सहीनें जाहिरात येऊं लागली. या धंद्यांत सखारामशास्त्री यांचें भांडवल मुळींच नसे. माहिती त्यांची, पण भांडवल पुराणिकांचें असा व्यवहार सुरू असे. त्यावेळीं पनवेलींत तात्याशास्त्री थोरात हेहि एक विद्वान गृहस्थ वैद्यकी करीत असत. तथापि सखारामशास्त्री व कृष्णशास्त्री ह्या जोडीची छाप पन-वेलीस विशेष बसली. इतकेंच काय, मुंबईचे रावसाहेब मंडलीक यांचे-कडेहि कधीं कधीं रोगाचे कठीण स्थितींत त्यांस औषध देण्यास जावें लागे. याप्रमाणें कृष्णशास्त्र्यांच्या कर्तबगारीनें व सखारामशास्त्री यांच्या मदतीनें पुराणिक घराण्याचे जीवनवृत्तींत स्थित्यंतर घडून आलें.

कलियुगांतील या नव्या मनूंत ब्राह्मणांच्या चरितार्थाची व्यवस्था पूर्वीप्रमाणें न राहिल्यामुळें ब्राह्मणांना द्रव्यार्जनाकरितां अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, प्रतिग्रह, ह्या मार्गांशिवाय दुसरे योग्य मार्ग अनुसरणें भागच पडलें. मनू म्हणतो:—

**ऋतामृताभ्यां जीवेत्तु मृतेन प्रमृतेन वा ।**
**सत्यानृताभ्यामपि वा न श्ववृत्त्या कदाचन ॥**

मनु ४।४

[ ब्राह्मणानें ऋत [ उञ्छ व शिल या वृत्तीनें टाकलेले कण व कणसें वेंचून ] अमृत [ अयाचित वृत्तीनें मिळालेलें घेऊन ] यांच्या योगानें जीवंत राहावें अथवा मृत [ भिक्षावृत्तीनें ] व प्रमृत [ शेती करून ] यांच्या योगानें निर्वाह करावा. निदान सत्य व अनृत यांच्या योगानें [ व्यापारधंदा करून ] उपजीविका करावी पण आपत्ति नसतांना श्ववृत्ति [ सेवाचाकरी ] पत्करून उदरभरण करूं नये. ]





# प्रकरण ५ वें.

## आयुर्वेद.

चिकित्सितात्पुण्यतमं न किञ्चिदपि शुश्रुम ।

सुश्रुत

[ वैद्यकीइतकें पुण्यकारक कर्म दुसरें ऐकिवांत नाहीं. ]

मागील प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें पेंडखळच्या पुराणिकांपैकीं पनवेलच्या शाखेनें आपलें मुख्य वैदिक कर्म संभाळून आयुर्वेदाची परिचर्या चरितार्थाकरितां करण्याचें पत्करलें. ब्राह्मणांनीं आपल्या मुख्य कर्मावरील एकनिष्ठा सोडली किंवा परिस्थितीमुळें ती त्यास सोडावी लागली, तरी त्याच्या खालोखालचा दुसरा कोणता व्यवसाय त्यांनीं पत्करावा हाहि विचार आहे. तो विचार करून आपला व्यवसाय ठरविण्यांत पुराणिकांनीं आपलें ब्राह्मण्य चांगलें राखलें, हें त्यांस भूषणावह होय. नागरिकांच्या सामान्य कर्तव्यपालनांत कृष्णशास्त्री लोकांच्या उपयोगी पडतच होते. पण आतां त्यांनीं लोकोपकारक असा आयुर्वेद हस्तगत केल्यामुळें ते लोकांस अधिकच हवेसे वाटूं लागले.

'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' असें या शरीराचें माहात्म्य असल्यामुळें शरीराला प्रशस्त दीर्घायुत्व देणें हें अमृतत्वप्राप्तीस साधनीभूत आहे. म्हणूनच धन्वंतरीनें इंद्राकडून मिळवलेली ही विद्या म्हणजे साक्षात् अमृत होय. अशी आख्यायिका आहे. ऋग्वेदाबरोबरच आयुर्वेद प्रगट झाला. ऋग्वेद आपण अनादि मानतों. प्राच्य विद्यासंशोधक ऋग्वेदाचा काळ कमींत कमी ख्रिस्ती सनापूर्वीं चार हजार हा ठरवितात. पण हा काल त्यांस आणखी बराच मागें लोटावा लागेल, असें भूगर्भांतून जे नवीन नवीन शोध लागत आहेत, त्यावरून म्हणावें लागतें. निदान एक गोष्ट सर्वांना मान्य आहे ती ही कीं, ऋग्वेद हें जगांतील उपलब्ध वाङ्मयापैकीं अत्यंत प्राचीन वाङ्मय होय. त्याहून प्राचीन वाङ्मय जगांत आज तरी उपलब्ध नाहीं. त्या ऋग्वेदांत हजारों वनस्पतींचें गुणवर्णन केलेलें आंढळतें. ऋग्वेदांत राजयक्ष्म्यावर एक सबंध सूक्तच आहे. ज्याला अर्वाचीन ऋग्वेदाचा काल असें म्हणतात, त्याकाळीं शस्त्रक्रिया, सूतिकाशास्त्र, वैद्यशास्त्र, बालशुश्रूषा, रोगोपचारपद्धति, आरोग्यशास्त्र इत्यादि शास्त्रांत बरीच प्रगति झाली होती, असें ऐतिहासिक मानतात. अथर्ववेद हा तर आयुर्वेदाचा पायाच आहे. अथर्ववेदांत महाव्याधि, कावीळ, उदर, गंडमाळा इत्यादि रोगांवर मंत्र, तोडगे, औषधि या तर सांगितल्या आहेतच; पण मनुष्याच्या सांगाड्याचे निरनिराळे अवयव फार व्यवस्थित रीतीनें वर्णिले आहेत. याशिवाय मूत्रशलाकादि यंत्रांचेंहि वर्णन त्यांत आढळतें.

आयुर्वेदांत शरीरस्वास्थ्य कसें राखावें ? रोगाचीं कारणें काय ? रोगलक्षणें कोणतीं ? आणि रोगनिवारण कसें करावें ? यांचा विचार केला आहे. आयुर्वेद अथर्ववेदाचें एक उपांग आहे. त्याचे आठ भाग केले आहेत. ते येणेंप्रमाणें:—

( १ ) शल्य तंत्र [ शस्त्र प्रयोग करून रोग बरें करण्याचें शास्त्र ] ( २ ) शालाक्य तंत्र [ ऊर्ध्वांग मुख, कर्ण, नेत्र वगैरे ठिकाणचे रोगांवर प्राय: शलाकेनें कर्म करावें लागतें, तत्संबधींचें शास्त्र, ] ( ३ ) काय-चिकित्सा [ ताप वगैरे सर्व देहिक रोगांवरील उपचारांचें शास्त्र; ] ( ४ ) भूतविद्या [ ग्रहपीडा व इतर मानस विकारांवरील उपचारशास्त्र ] ( ५ ) कौमारभृत्य [ बालकांचें स्वास्थ्य संरक्षण व व्याधिपरिहाराचें शास्त्र ] ( ६ ) अगद तंत्र [ स्थावर-जंगम विषारांवरील उपचारशास्त्र ]; ( ७ ) रसायन तंत्र [ अकाल जरेचा परिहार करून आयुष्य वृद्धि साधून देणारें शास्त्र ] व ( ८ ) वाजीकरण तंत्र [ सर्व धातु-विशेषत: शुक्र धातु वाढवून तद्वारां निरपत्यांस अपत्यप्राप्ति करून देणारें शास्त्र. ] शिवाय ज्यांत शारीर-वर्णन अगदीं तपशिलवार केलें आहे, असें एक स्वतंत्र उपनिषद्हि आहे.

आयुर्वेदाच्या अनुयायांच्या दोन परंपरा आहेत. एक शल्य-चिकित्सकांची व दुसरी काय-चिकित्सकांची. शल्य-चिकित्सकांची परंपरा ब्रह्मदेव-प्रजापति-अश्विनीकुमार-इंद्र-धन्वंतरिदिवोदास-सुश्रुतादि शिष्य अशी असून त्यांचा प्रधान ग्रंथ सुश्रुतसंहिता हा आहे. काय-चिकित्सकांची परंपरा ब्रह्मदेव-प्रजापति-अश्विनीकुमार-इंद्र-भरद्वाज-आत्रेयादि मुनि-आत्रेयशिष्य अग्निवेशादि सहा, याप्रमाणें असून यांचा मुख्य ग्रंथ चरकसंहिता हा होय. आयुर्वेद वाङ्मयांत चरक संहिता फार प्राचीन मानली जाते. धन्वंतरी हे काशी नगरचे आधिपति होते. त्यांनीं वानप्रस्थ स्वीकारल्यावर त्यांच्याकडे अनेक ऋषि मंडळी येऊन आयुर्वेद शिकले. दुसऱ्या परंपरेंतील चरक हे इराण अरबस्थान इकडे गेले होते. तसेंच शिकंदरानें येथील नामांकित वैद्य आपल्या-बरोबर स्वदेशीं नेले. सुश्रुतावर एक ग्रीक भाषेंत भाषांतरवजा ग्रंथ आहे. याप्रमाणें आर्यवैद्यकाचा प्राचीन इतिहास आहे.

वैदिक वाङ्मयांत ज्याप्रमाणें अश्विनीकुमार हे देवांचे वैद्य म्हणून प्रसिद्ध आहेत, त्याचप्रमाणें पौराणिक वाङ्मयांत रामरावण-युद्धांत रामाच्या सैन्यांत सुषेणादि नामांकित वैद्य होते. तसेंच कौरव-पांडवांच्या भारतीय युद्धांतहि उभय पक्षांकडे उत्कृष्ट वैद्य होते. त्या युद्धांत दुर्योधनाच्या शरीरांत जेव्हां एक बाण जोरानें घुसला, तेव्हां सैन्यांतील शस्त्रवैद्यानें त्यास ताबडतोब औषधिमिश्रित एका मोठ्या जलपात्रांत नेऊन बसविलें, आणि त्या पाण्यांत असतां त्याचा बाण काढला, अशी कथा आहे.

चरक आणि सुश्रुत हे दोनच ग्रंथ पाहिले तरी इतक्या प्राचीन काळीं आजकालच्या पाश्चात्यांच्या बहुतेक सर्व अर्वाचीन पद्धति अमलांत होत्या, असें दिसून येईल. उदाहरणार्थ, एनिमा देण्याची पद्धति पक्ष्यांपासून पाश्चात्यांनीं उचलली असें न म्हणतां ती चरकांतून घेतली, असें म्हणणें जास्त सयुक्तिक ठरेल. रोग्यांच्या कपड्यांची शुद्धि कशी करावी, मुलांना औषधोपचार करितांना काय काय युक्त्या योजाव्या वगैरे अनेक लहान मोठ्या मुद्यांसंबंधीं वर्णनें वाचलीं म्हणजे हिंदुस्थानचा अजाण रानटी काळ आजचा, अव्वल इंग्रजी-नंतरचा, का पूर्वींचा, याबद्दल भ्रम उत्पन्न होतो!

आत्रेय पुनर्वसू यांच्या कायचिकित्सेचा आद्य ग्रंथ चरकसंहिता, व धन्वंतरी यांच्या शल्यचिकित्सेचा आद्यग्रंथ सुश्रुत, अशा अलीकडील कांहींशा अर्वाचीन पद्धतींप्रमाणें पूर्वींहि वैद्यकींत दोन स्वतंत्र चिकित्सापद्धति होत्या. मात्र अलीकडे या पद्धतींत ज्या आणखी जाती व पोटजाती पडत चालल्या आहेत, त्या जवळ जवळ हास्यास्पदच आहेत. रोगी जर दुर्दैवानें श्रीमंत असला तर त्याच्या अगदीं सामान्य विकारासाठीं त्याला मुंबईसारख्या सोयीस्कर शहरीं सात आठ प्रकारच्या डॉक्टरांकडेहि जावें लागतें; कारण एक म्हणतो,

तुम्ही दांत साफ करून या. दुसरा म्हणतो, तुम्ही लघवी तपासणाराकडे जा, तिसरा त्याला एक्स–रेजचा फोटो घेण्यास लावतो, चवथा विद्युत् चिकित्सक डाक्टरांकडे जाण्यास लावतो, पांचवा शस्त्रक्रिया केल्यावाचून गत्यंतर नाहीं असें म्हणतो, साहवा कोन्नूर, पांचगणी, डार्जिलिंग, मसुरी नाहीं तर, रोगी कूळ ठळक असल्यास, आस्ट्रिया, स्विट्झरलंड इकडे पाठवितो. मग तेथें स्थानमाहात्म्याप्रमाणें आणखीहि पुष्कळच अधिक प्रकार असणार हें उघड आहे. तात्पर्य, उजव्या कानाचा डॉक्टर वेगळा, डाव्या कानाचा वेगळा, दांत उपटणारा वेगळा, दांत घांसणारा वेगळा, दांत बसविणारा वेगळा, दांतांवर औषध देणारा वेगळा असे किती प्रकार होतील? कांहींच सांगवत नाहीं! 'अति सर्वत्र वर्जयेत्' हेंच खरें. आणि म्हणून मीहि याचें अधिक वर्णन करण्याचें सोडून देतों.

सुदैवानें आपलेकडे पूर्वीं चरक आणि सुश्रुत यांचे अनुक्रमें रोगविज्ञान व शारीरविज्ञान, तसेंच औषधियोजना व शस्त्रक्रिया हे जे विशिष्ट गुण त्यांना आणखी फाटे फुटत गेले नाहींत. इतर कोणत्याहि देशाचा सांस्कृतिक इतिहास व हिंदुस्थानचा सांस्कृतिक इतिहास यांत आणखी एक मोठाच विस्मयकारक फरक वाटतो, तो असा कीं पाश्चात्य देशांत कोणत्याहि भौतिक शास्त्रांत हळूहळू ज्ञानाची वाढ होत आली आहे, असें निर्विवाद दिसतें. उलट पक्षीं, आपल्या येथील चरक-सुश्रुतापासून तों अलीकडील वैद्यकीय बाडें व संगीत वैद्यकीपर्यंत वैद्यक शास्त्राची विशेष वाढ झालेली दिसत नाहीं. उलट पक्षीं, मूळचेच चरक व सुश्रुत हे ग्रंथ इतके विचारपरिप्लुत आहेत कीं, त्यांची अध्ययनपरंपरा व उपयोग आजच्या पाश्चात्य पद्धतीइतका जर आजपर्यंत जोरानें अखंडित सुरू असता, तर आर्यवैद्यकीच्या तेजानें पाश्चात्य वैद्यकी खातरीनेंच झांकली गेली असती! परंतु राजा-

श्रय आणि स्वास्थ्य यांच्या अभावीं आर्यवैद्यकाची इतकी अनास्था झाली आहे कीं, आजच्या डॉक्टरांचीं वैशिष्ट्यें म्हणून गणलेली.कानाला लावायची नळी किंवा दुसरें साधन, शस्त्रक्रियेचे वेळचे मादक व संमोहिनी इलाज, शस्त्रक्रियेचीं निरनिराळीं हत्यारें, धातूंचीं निरनिराळीं रसायनें, पिचकाऱ्या, मूत्र काढण्याचीं यंत्रें इत्यादि साऱ्या योजना व उपकरणें चरक आणि सुश्रुतांत आहेत, असें कोणास सांगितल्यास त्यास तें खरेंहि वाटणार नाहीं. इ. सनापूर्वीं तिसऱ्या शतकांतील शिलालेखांत अशोकराजानें माणसांप्रमाणें पशूंकरितांहि ठिकठिकाणीं दवाखाने काढले असल्याचा उल्लेख आहे. मिगॅस्थेनीस याच्या ग्रंथांतहि येथील पशुवैद्यकाचा उल्लेख आहे.

पण काळाची गति किती विचित्र आहे पहा! पांच हजार अथवा दहा हजार वर्षांपूर्वीं या आर्यावर्तांत राहण्यास आलेल्या आर्यांचे आम्हीं वंशज कसे तरी अद्याप जीव धरून आहोंत; पण ज्यांनीं स्वर्गांतून अमृतकुंभ आणला त्या अलौकिक योग्यतेच्या दिवोदास धन्वतऱ्यांचें काशींतील विद्यापीठ आज कोठें आहे! आयुर्वेदाचे शिक्षणाबद्दल प्राचीन काळीं विशेष प्रसिद्ध असलेली तक्षशिला तर पृथ्वीच्या पोटांतच गडप झाली! आणि जेथें विद्यार्थ्यांचे शंभर वर्ग होते व दहा हजार विद्यार्थी जेथें शिकत असत, त्या नलंद विद्यापीठाचा आज मागमूसहि राहिला नांहीं! गौतम बुद्धाच्या तैनातींतील 'जीवक' नामक वैद्याच्या वैद्यकीय चातुर्याच्या दंतकथाच काय त्या आज उरल्या आहेत! आमच्या देशांतील नामांकित वैद्य शिकंदरानें आपल्या देशांत नेले आणि आम्हाला वाडवडिलांचा नुसता लौकिक सांगण्यापुरतेंच ईश्वरानें अद्याप जिवंत ठेवलें! पूर्वींचीं धर्मार्थ इस्पितळें, पूर्वींचे धर्मार्थ वैद्यकी करणारे प्रचारक वैद्य, किमयाकार नागार्जुन, रसायनशास्त्रज्ञ पातंजल आणि वराह-

मिहीर अशीं कित्येकांचीं नांवें घ्यावीं; ते आज नाहींत ! वाग्भटांचें नांव चालविणारे आज भट नाहींत; माधवाचार्यांचें यश टिकविणारे आचार्य कोठें दिसत नाहींत; भावमिश्रांसारखे अर्वाचीन ग्रंथकार व अध्यापकहि कोठेंच आढळत नाहींत !

तात्पर्य, गेल्या निदान सहा हजार वर्षांच्या आपल्या सांस्कृतिक इतिहासाकडे पाहिलें तर परमाणूवाद, उत्क्रांतिवाद, विकासवाद, गतिशास्त्र, गुरुत्वाकर्षण, शब्दमीमांसा, ज्योतिषशास्त्र, गणितशास्त्र, वैद्यकशास्त्र, रक्ताभिसरणशास्त्र, त्रिदोष चिकित्सा, शस्त्रक्रिया, संमोहनशास्त्र, रसायनशास्त्र, किमया, योगशास्त्र, मंत्रशास्त्र इत्यादि अनेक भौतिकशास्त्रें, विद्या आणि कला यांचा ऱ्हासच होत आलेला आपण पहात आहोंत ! आणि आतां क्षुल्लक गोष्टींपासून महत्वाच्या प्रश्नांपर्यंत पाश्चात्यांच्या तोंडाकडे दुर्बलतेनें पाहण्याची वेळ आली आहे ! 'वास्तविक भारतीय वैद्यकानें आरबी वैद्यक सुसंपन्न केलें आणि आरबी वैद्यकानें पाश्चात्य वैद्यक उद्धरिलें. अशा स्थितींत पाश्चात्य वैद्यकाचें ग्रहण म्हणजे आर्यवैद्यकाच्या एका शाखेचें ग्रहण होय.'

भिषग्विलासकारांनीं कांहीं वर्षांपूर्वी आर्यवैद्यकीच्या दुःस्थितीचें वर्णन करतांना कांहीं मुद्दे चिंतनीय म्हणून नमूद केले आहेत. त्याचा भावार्थ असाः—"तीन हजार वर्षांमागच्या आर्यवैद्यकांत अलीकडे दीड हजार वर्षें प्रगति बंद आहे. उलट ऱ्हास मात्र सुरू आहे. आर्यवैद्यकाची शिक्षणाची सोय असावी तशी नाहीं. आर्यवैद्यकास राजाश्रय नाहीं. उलट वैद्यकीचा धंदा वाटेल त्यानें करावा. त्याला परीक्षेची गरज नाहीं. चरक, वाग्भट, सुश्रुतासारखे ग्रंथकार तर निपजत नाहींतच; पण वैद्यांची परंपरा बुडल्यामुळें अनुभविक ज्ञानाचाहि लाभ मिळत नाहीं. आजच्या वैद्यांस शरीररचनेची माहिती अगदींच बेताची असते. आपल्याकडे इंद्रियविज्ञानशास्त्र नाहीं. शस्त्रक्रियेची

ग्रंथोक्त माहिती असली तरी शस्त्रक्रिया नापितावांचून कोणी करीत नाहीं. रसायनशास्त्राची माहिती अगदींच स्थूल असून उपकरणें फारच ओबडधोबड आहेत. औषधिक्रियेस रसायनशास्त्राची कसोटी नसल्यामुळें, औषधें जशीं तयार व्हावीं तशीं होत आहेत कीं नाहींत, तें ठरविणें कठीण झालें आहे. वनस्पतिशास्त्र व इतर वैद्यकीय शाखा यांवर आजपर्यंतच्या माहितीची स्वतंत्र ग्रंथरचना नाहीं. नवीन शोध करण्याची प्रवृत्ति नाहीं. सूक्ष्मदर्शक यंत्रासारखें साहित्य नाहीं. एकाहि वैद्यकीय शाखेंत किंवा ग्रंथांत अधीत असे फारसे वैद्य आढळत नाहींत. अक्षरशत्रु अशा नाडी वैद्यांच्या आचरट क्रियांमुळें उत्कृष्ट आर्यवैद्यकाचें नांव बद्दू झालें आहे. गरीब आणि श्रीमंत जो तो डॉक्टराकडे धांवतो. कारण आर्यवैद्यकीय चिकित्सेवर व औषधींवर लोकांचा भरंवसा राहिला नाहीं."

इंग्रजी औषधें मद्यार्क मिश्रित असल्यामुळें ती शरीरांत लवकर भिनतात, त्या औषधांची शुद्धता, टापटीप, व औषधें देणाऱ्या डॉक्टरांची तपासणी, व सामान्य लोकांस थांग न लागणारे त्यांचे शास्त्रीय पद्धतीचे आविर्भाव इत्यादि कारणांनीं इंग्रजी औषधांची मोहनी रोग्यांवर जास्त पडते. इतकेंच नव्हे तर इंग्रजी औषधें तयार करण्याचे यांत्रिक कारखाने गरजेपेक्षांहि औषधांची निपज जास्त करीत असल्यामुळें वनस्पति, जनावरें आणि माणसें यांना द्यावयाचीं रासायनिक द्रव्यें इतकीं मुबलक व स्वस्त तयार करतां येतात कीं, स्वस्ताईच्या दृष्टीनें सुद्धां आर्यवैद्यक आज महाग पडेल कीं काय अशी भीति वाटते. ही गोष्ट कोणास कदाचित् खरी वाटणार नाहीं. पण ज्या अभागी आणि अनाथ देशाला जपान आणि रंगून यांच्याबरोबर तांदुळाचे व्यापारांत टिकाव धरवत नाहीं, कापसाचे व्यापारांत टिकाव धरवत नाहीं, तो यांत्रिक कलेंत अत्यंत मागासलेला देश

माणसांचे श्रमानें तयार होणाऱ्या कोणत्याहि मालांत कसा टिकाव धरील, हा प्रश्नच आहे.

आज पाश्चात्य वैद्यक फार सुधारलें आहे व आर्यवैद्यक मागसलें आहे. या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. पण अशा रीतीनें दुःस्थितीचें वर्णन करणारे व आपलेच दोष व आपले धर्मांतील कलंक लोकांस दाखवून त्यांस हिणवणाऱ्या लहान थोर वक्त्यांपेक्षां आणि लेखकांपेक्षां अशी निंदा करण्याचा व्यर्थ उपद्याप न करितां आपली स्थिति सुधारण्याचा जे बिनबोभाट प्रयत्न करतात, त्यांचींच चरित्रें या टीकाकार पुढाऱ्यांपेक्षां जास्त उपयोगाचीं, मार्गदर्शक व चिंतनीय आहेत असें मला वाटतें.

बोलेल तो करील काय, असें म्हणतात तेंच खरें. आजचे देशाचे पुढारी त्यांच्या व आमच्या दुर्दैवानें भ्रमित झाले आहेत. शुद्धि म्हणजे धर्मसंकर, चातुर्वर्ण्य म्हणजे प्रतिलोम अनुलोमविवाह, स्पृश्यास्पृश्यता विवेक म्हणजे धर्मावरील कलंक, गीतेंतील यज्ञचक्र म्हणजे सूत काढण्याचा राहाट, असें मानेल तें लोकांना सांगून लोकांचा व्यर्थ बुद्धिभेद करून कालहरण करीत आहेत. आम्हाला आमचें तें सारें वाईट असें भासूं लागलें आहे. आणि बहिर्मुख जे पाश्चात्य त्यांच्या तोंडांकडे आम्ही आश्चर्यानें व आशाळपणानें पाहात आहोंत. आर्यवैद्यक येथून अरबस्थानांत गेलें तेथूनच परत येथें वेशांतरानें येऊन मुसलमानी दरबारांत राजाश्रय पावलें. तेंच आर्यवैद्यक अरबस्थानांतून युरोपात गेलें, आणि तेथून परत रूपांतरांत येथें येऊन येथें राजाश्रय पावलें. येथें आलेल्या ख्रिस्ती धर्माभिमानी मिशनऱ्यांनीं येथें आंग्लवैद्यकीचा फार झपाट्यानें प्रसार केला. त्यांचे धर्मार्थ दवाखाने, मिरजवाई इत्यादि ठिकाणचीं त्यांचीं शस्त्रक्रियेचीं इस्पितळें, तसेंच उदार पार्शी गृहस्थांच्या मोठमोठ्या देणग्यांचे मदतीनें सरकारनीं ठिकठिकाणीं उघडलेले धर्मार्थ दवाखाने व इस्पितळें, यांनीं आर्यवैद्य-

कीच्या पडत्या काळांत लोकांवर सहजच छाप टाकली. त्यांत सरकारनीं वैद्यकीय शिक्षण संस्था सुरू केल्या त्या केवळ आंग्ल-वैद्यकीच्याच असल्यामुळें त्या शिक्षण संस्थांतून बाहेर पडणारे डॉक्टर जाणूनबुजून किंवा निरुपायानें पाश्चात्य वैद्यकीचे दलाल बनले. आणि त्यांची शारीर चिकित्सा, त्यांची शस्त्रक्रिया, त्यांची टापटीप व भपका यांनीं लोक मोहून गेले.

तात्पर्य, आम्ही आज आमच्या संस्कृतीला, आमच्या धर्माला पारखे झालों आहोंत! आम्हाला आमचें असें सारेंच नकोसें झालें आहे! 'अहो, ह्या पाश्चात्यांपासून आपल्याला किती तरी शिकावयाचें आहे' असें बोलावयास आम्हांला नामुष्कीहि वाटत नाहीं! आज ह्या अभागी देशांत असंख्य डॉक्टर आणि वैद्य असतील; इतके साथीचे व हीनवीर्य करणाऱ्या नवीन राहणीनें उत्पन्न होणारे नवे नवे रोग उत्पन्न होत असूनहि रोग्यांचे मानानें डॉक्टरांची संख्या जरूरीपेक्षां पुष्कळ जास्तच वाढत आहे! पण त्यांचेपैकीं आर्यवैद्यकाचें पुनरुज्जीवन करून पाश्चात्यांच्या औषध विक्रीची दलाली बंद करण्यासाठीं झटणारे किती आहेत?

यालाच त्यागाची व सेवेची भूमिका लागते, यालाच अध्यात्माचें पाठबळ लागतें. पुण्यशील व निस्वार्थी अशा वैद्याच्या हाताला विलक्षण यश असतें. शिरोभागीं दिलेल्या सुश्रुतवचनाचें रहस्यहि हेंच आहे. उत्तरोत्तर वैद्यकशास्त्राची प्रगति रोगनिवारणापेक्षां रोगप्रतिबंधाकडेच जास्ती वाढत आहे. पण रोगप्रतिबंधाच्या इलाजांत सदाचार व सद्विचार हा जो मुख्य उपाय त्याचा आपल्या धर्मशास्त्रांत जितका खोलवर विचार केला आहे, तितका पाश्चात्यांच्या आजच्या प्रयत्नांत खोलवर विचार केलेला दिसत नाहीं. त्यांची पृथक्करणाची दृष्टि ज्या मानानें सूक्ष्म झाली आहे, त्या मानानें समन्वयाची दृष्टि त्यांचे

ठिकाणीं दिसत नाहीं. यामुळें परपुरुषाची पापी नजर न लागावी म्हणून तोंडावरून पदर ओढणारी एखादी मारवाडी स्त्री आपलें पोट खालीं उघडें पडत आहे इकडे अवधान देत नाहीं, त्याचप्रमाणें नवीन संस्कृतीचे रोगप्रतिबंधक व रोगनिवारक उपाय निरनिराळे अपाय उत्पन्न करीत आहे. खास इंग्लंडांतील आंग्लवैद्यक संमेलनांतील वृद्ध, अनुभवी व प्रख्यात डॉक्टरांचीं भाषणें वाचलीं म्हणजे आंग्लवैद्यकीनें आजवर प्रयोगादाखल इतर प्राण्यांचेच नव्हे तर माणसांचेहि किती बळी घेतले आहेत, तें तज्ज्ञांच्या साक्षीनिशीं ध्यानांत येईल. या अनर्थाच्या अनेक कारणांपैकीं एक कारण असें आहे कीं देशी औषधांपेक्षां विदेशी औषधें स्वभावतःच घातक होण्याचा संभव अधिक आहे. तसेंच याचें दुसरें कारण भारतीय वैद्यक ज्याप्रमाणें पायाशुद्ध आहे, सांख्यपातंजल, न्याय वैशेषिक व वेदान्त यांचा ज्याप्रमाणें त्यास आधार आहे, तसें पाश्चात्य वैद्यक पायाशुद्ध नाहीं. वरीलप्रमाणें मूलग्राही विचार न करितां निर्माण होणारें शारीरशास्त्र म्हणजे आधुनिक विद्वत्तेकडून होणारा अक्षम्य प्रमाद होय. पाश्चात्य वैद्यक जडवादी आहे, हा त्यांच्यांत दोष आहे. पण त्यांच्याच डोळ्यांनीं पाहणारे जे आम्ही त्यांस हें कळेल तेव्हां खरें! या चरित्रांत ह्याच जाणिवेचें वर्णन करावयाचें आहे. पुराणिकांच्या वैद्यकीय सल्ल्याचें ब्रीदवाक्य आहे तें असें:—

**नित्यं हिताहार विहार सेवी समीक्ष्यकारी विषयेष्वसक्तः।**
**दाता समः सत्यपरः क्षमावानाप्तोपसेवी च भवत्यरोगः॥**

वाग्भट ४।३७

[ जो मनुष्य नित्य हितकारक आहारविहारांचें सेवन करितो, विचार करून एखाद्या कार्यास प्रवृत्त होतो, विषयलंपट होत नाहीं व जो दानशील, समदृष्टि, सत्यवक्ता, क्षमावान् व सद्वाक्याचें अनुवर्तन करणारा तो सदा निरोगी राहतो. ]



# प्रकरण ६ वें.

## नागरिकत्व आणि व्यक्तित्व

**गृहस्थस्त्वेष धर्माणां सर्वेषां मूलमुच्यते ॥**

महाभारत १२।२३।६

[ गृहस्थाश्रमी पुरुष हा सर्व धर्मांचा मूळ आधार आहे .]

मागील प्रकरणांत आर्यवैद्यकीचा जो उत्कर्षापकर्षाचा इतिहास वर्णिला आहे, त्यांत क्रान्ति घडवून आणण्यास गांवोगांवीं सामान्य वैद्यकीचा धंदा करून त्यावर प्रपंचाचा गुजारा करणारे वैद्य समर्थ होत नाहींत. अशा समर्थ वैद्यांचें व्यक्तित्व असामान्य असावें लागतें. तथापि गांवांतील नागरिकांत सामान्य वैद्यहि एक शिष्ट गणला जातो. अव्वल इंग्रजींत एकीकडे आंग्ल वैद्यकीचें आक्रमण होत असतां गांवोगांवीं पिढीजात वैद्यकी चालविणारे वैद्यहि चांगली इभ्रत संभाळून असत, आणि कित्येक गांवीं तर डॉक्टरांपेक्षां लोकांचा वैद्यांवरच भरंवसा जास्त असे. सखारामशास्त्री व कृष्णशास्त्री यांची गणना याच वर्गांत होते. परंतु परकीय संस्कृतीची अंगावर धांवून येणारी लाट थोपवून धरण्याचें सामर्थ्य या गांवोगांवच्या वैद्यांत नसतें. कोणत्याहि परिस्थितींत क्रांन्ति घडवून आणणारे पुरुष सामान्य नागरिकांहून वेगळ्याच जातीचे असतात. त्यांची महत्त्वाकांक्षा, त्यांची बुद्धि, त्यांची कार्याची धडाडी, त्यांचें साहस हें सारेंच वेगळें

असतें. ते स्वतां तेजस्वी असतात व इतरांचेंहि तेज वाढवितात. शिवछत्रपती पुढें आले नसते तर तानाजी आणि हिरूजी, पंत आणि आमात्य, बाळाजी आवजी आणि बाजीप्रभू हे आपआपल्या गांवांचे सामान्य नागरिकच होऊन राहिले असते, इतकेंच ! बौद्धकालानंतर वैदिकांचा माथा उजळ ठेवायला शंकराचार्यांसारख्या अलौकिक पुरुषाची गरज होती. तो काळ आणि आजचा काळ जरी भिन्न आहे, तरी विचारांतील तारतम्य देशकालानें सर्वस्वीच पालटतें असें नाहीं. पाण्याच्या हौदांच्या ठिकाणीं नळ आले तरी मूळ जलाशयाची शुद्धता व व्यापकपणा यांतील महत्त्व कायमच राहातें. व्यक्तित्वाचें खरें ऐश्वर्य बुद्धीच्या असामान्य विकासांत आहे; वैयक्तिक सुखलालसेंत नाहीं. आज जी व्यक्तित्वाची लोकांत आवड दिसते ती भोगस्वातंत्र्यापुरतीच आहे.

नागरिकत्वांत अशा व्यक्तित्वाचें मुंडण आहे. उलट खरें व्यक्तित्व हें नागरिकत्वाच्या मर्यादा मोडणारें आहे. नागरिकत्व हें यत्नसाध्य आहे. व्यक्तित्व—असामान्य व्यक्तित्व—ईश्वरानें दिलें तरच असतें. असामान्य व्यक्ति नागरिकत्वाला भूषणभूत होईल. तसेंच नागरिकत्व हें असामान्य व्यक्तीचें कोंदण असेल तर तें व्यक्तित्व अधिकच उपयुक्त ठरेल व खुलेल. असामान्य व्यक्तित्व आणि सामान्य नागरिकत्व ही बुद्धीची विषम वांटणी आहे. यास्तव त्यांच्या मिळणींतच साम्य आहे. देव आणि भक्त यांत विशेष आणि सामान्य भाव असला तरी देवाचें देवत्व भक्तांकडून सिद्ध होण्यांतच भूषण आहे. सामान्यत्व आणि विशेषत्व यांचा विचार करितां खरोखर निरोगी प्रजेला श्रेष्ठ मानावें किंवा वैद्यराजाला श्रेष्ठ मानावें, हा प्रश्नच आहे. कांहीं असो, अत्याश्रमी जसा श्रेष्ठ तसा गृहस्थाश्रमीहि श्रेष्ठच होय.

मनुष्य हा एक कुटुंबवत्सल, समाजप्रिय प्राणि आहे आणि तो एक

बुद्धिमान प्राणि आहे. या उभय दृष्टीनें मनुष्याचा उद्योग, स्वभाव, त्याची राहाणी, व त्याची योग्यता यांत अंतर पडतें. मनुष्याचे आचारविचार यासंबंधींच्या स्वातंत्र्याला धर्मानें निर्बंध घालून हें अंतर आर्यसंस्कृतींत बरेंच कमी केलें आहे. पारतंत्र्याच्या जरबेंतहि स्वातंत्र्यावर बराच आळा बसून हें अंतर फारसें जाणवत नाहीं. धर्माचे निर्बंध हे स्वार्थनिरपेक्ष असतात. राजकारणाचे निर्बंधांत राजकर्त्यांची स्वार्थबुद्धि असते. यामुळें धर्मबंधनांत वाढलला उत्तम नागरिक व उत्तम पुरुष आणि राजकीय बंधनांत वाढलेला उत्तम नागरिक व उत्तम पुरुष यांत महदंतर असतें. पहिला तेजस्वी होतो. दुसरा खुरटलेला असतो.

आपल्या देशांतील पुढारी फार करून दुसऱ्या वर्गात येतात, यामुळें ते प्राचीनांप्रमाणें आदर्श पुरुष ठरत नाहींत, हा कांहीं मी त्यांचा दोष दाखवीत नाहीं. हा अपरिहार्य परिस्थितीचा परिणाम आहे. जेथें प्रजा व राजा यांचे हितसंबंध एकमेकांस विसंगत असतात, तेथें राजसत्तेच्या दाबाखालीं नागरिकत्व व व्यक्तित्व या दोघांसहि साहजिकच निःसत्वता प्राप्त होते. कांहीं एका मर्यादेपलीकडे परकीय सत्तेंत विकासाला वावच नसतो. धर्मबंधनाची गोष्ट तशी नाहीं. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी आहे कीं, एक राजकीय बंधन अपरिहार्य म्हणून जसें पत्करावेंच लागतें, तसें दुसरें धर्मबंधनहि अपरिहार्य आहे अशी जाणीव आपल्या ठिकाणीं नसल्यामुळें तें पुष्कळांस झिट्कारावें असें वाटतें! या त्यांच्या धर्मनिरपेक्ष स्वातंत्र्याच्या धडपडींत त्यांच्या व्यक्तित्वाचा तर विकास होत नाहींच, पण नागरिकत्वहि त्यांस पाळतां येत नाहीं. वैयक्तिक धर्मपालनांतच समाजधर्म सिद्ध होतो.

धर्मबंधन घालण्यांत वास्तविक धर्मशास्त्रकारांना कोणताच स्वार्थ साधावयाचा नसतो; उलट मनुष्यमात्राची स्वाभाविक प्रवृत्ति आणि

ब्रह्मविद्येस अगत्य असलेली निवृत्ति हीं दोन्ही नजरेपुढें ठेवून हिंदूंच्या धर्मशास्त्रानें व्यक्तित्वाचा असा सुंदर ठसा बनविला आहे कीं, उत्कृष्ट व्यक्तित्वाचे द्वारा उत्तम समाजसंघटनाहि आयती सिद्ध व्हावी. आज आम्ही वैयक्तिक धर्माचा विचार न करितां सामाजिकत्वाचाच विचार करीत असतों. असा उलट विचार करितांना धर्मशास्त्राच्या पायऱ्या व निर्बंध हे सहजच दृष्टिआड होतात, आणि अनियंत्रित वैयक्तिक सुखलालसा व वैयक्तिक स्वैराचार वाढतात. त्यामुळें समाजांत बेबंदशाही माजून अनेक अनर्थ उत्पन्न होतात. यास मुख्यत्वेंकरून जबाबदार आजचे आमचे पुढारी होत. त्यांना धर्माचाराचें अगत्य बिलकुल राहिलें नाहीं. आज आम्ही जातीजातींतील व धर्माधर्मातील भेद नाहींसे करून आणि आचारधर्म मोडून स्वराज्य मिळविण्यास उतावीळ झालों आहोंत. आणि मग स्वराज्य मिळविल्यावर मग आम्ही वर्णाश्रमधर्म, आणि नित्यनैमित्तिक कर्म यांचा जरूर वाटल्यास विचार करणार आहोंत. अशी ही उलट विचारसरणी आहे. याप्रमाणें व्यक्तिमाहात्म्याची दृष्टि सुटून केवळ सामाजिकच दृष्टि अंगिकारल्यामुळें लवकरच अशी वेळ येईल कीं, समाजाला योग्य मार्गदर्शक असे पुरुषच आढळणार नाहींत.

हिंदुधर्म हा व्यक्तिधर्म आहे आणि त्या व्यक्तिधर्मांतच कौटुंबिक धर्माची व समाजधर्माची उत्कृष्ट संपादणी आहे. हिंदुधर्म हा निवृत्तिप्रधान आहे आणि त्या निवृत्तींतच प्रवृत्ति कशी स्थिर व सुखदायी होईल याची गुरुकिल्ली आहे. पण आज सामान्य जनतेलाच काय, पण जनतेचे मार्गदर्शक म्हणविणारांनाहि हें निवृत्तीचें रहस्य कळत नाहीं, असेंच त्यांच्या आचारविचारांवरून म्हणावें लागतें.

साधारण समंजस मनुष्यालाहि ज्या वासना सहजसिद्ध असतात, त्यांचें लोकेषणा, वित्तेषणा, दारेषणा, ( यांतच कोणी

पुत्रेषणेचा समावेश करितात. ) याप्रमाणें मुख्य वासनांचें वर्गीकरण करून त्या एषणा तृप्त करण्याच्या प्रयत्नांस धर्म, अर्थ, काम असे तीन पुरुषार्थ मानले आहेत. अशा रीतीनें मानवी स्वभावाची योग्य जोपासना करून मनुष्यमात्राला देवऋण, पितृऋण आणि ऋषिऋण, अशी ऋणविमोचनांचीं कर्तव्यें लावून पुरुषार्थसिद्धींतील जो, माझा अमुक हक्क, तमुक हक्क असा हक्कांचा अहंभाव, त्यास कर्तव्याचे भाराखालीं नम्र केलें आहे. याचप्रमाणें तीन वर्ण, तीन आश्रम यांत श्रमविभाग व कर्तव्याची वांटणी करून संध्या, पंचमहायज्ञादि नित्यकर्में, आणि वैदिक उपासना यांच्या योगानें भूतमात्राच्या ठिकाणीं आत्मौपम्यबुद्धि आणि भगवद्भाव हळूहळू उत्पन्न करण्याची फारच मार्मिक योजना धर्मानें केली आहे. पण ही योजना कोणाला ? जे डोळे असून मदांध झाले, बुद्धि असून भ्रांत झाले, त्यांना ही योजना म्हणजे निरुपयोगीच वाटते. पण या योजनेंत व्यक्तिमाहात्म्य वाढविण्याची पूर्ण व्यवस्था असून शिवाय समाजासंबंधीं जी सहानुभूतीची व सहृदयतेची स्थिर दृष्टि प्राप्त होते, तिचा आजच्या सामाजिक चळवळींत अभावच दिसून येतो. आजच्या सामाजिक चळवळींत हिंदुमुसलमानांनीं एकमेकांचें रक्त एकमेकांनीं टोंचून घेण्यापर्यंत सहानुभूतीची क्षणिक लाट जरी उत्पन्न झाली, तरी ती जितक्या जोरानें उत्पन्न झाली, तितक्याच जोरानें ती मागेंहि गेली. कारण त्या लाटेला व्यक्तिमाहात्म्याकडून असावा तसा जोर कधींच मिळाला नाहीं.

नागरिकत्व व व्यक्तित्व या विषयांचें येथें जें विवेचन आरंभिलें आहे तें विषयांतर नव्हे. कृष्णशास्त्री पुराणिक हे एक उत्कृष्ट नागरिक होते. त्यांना आर्थिक स्वास्थ्य वरींच वर्षे मुळींच लाभलें नाहीं. पण त्यांच्या त्या गरीबींतहि त्यांनीं गृहस्थधर्माचें उत्कृष्ट पालन केलें.

उदाहरणार्थ, त्यांच्याप्रमाणें गरीबींतहि दाराशीं गाय व पंक्तीला अतिथि यांचें अगत्य पाळणारे गृहस्थ आज मितीस सुशिक्षित व सुखवस्तु गृहस्थांतहि किती आढळतील ? नेम फार करूं नये व नेमावांचून राहूं नये, अशी त्यांची मध्यम वृत्ति दिसते. पण धर्मनिष्ठेचें अवडंबर न माजवितांहि त्यांची सर्व जातींच्या समाजावर जी छाप होती, ती ते एक सच्छील धर्मनिष्ठ ब्राह्मण म्हणूनच होती, हें आजच्या नागरिकांनीं व पुढाऱ्यांनीं अवश्य लक्षांत ठेवावें. कोणी कांहीं अयाचित दिलें तर तें घ्यावें हा त्यांचा धर्मच होता. तथापिहि ते शक्य तों निस्पृह बाण्यानेंच रहात होते;म्हणूनच त्यांचें नैतिक वर्चस्व धनिकांनींहि मान्य झालें. त्यांच्या कारकिर्दीत पनवेलच्या श्रीरामजी बल्लाळेश्वर मंदिरांची फारच आबाळ झाली होती. दैवदुर्विपाकानें श्री. बापटांची स्थिति फारच खालावली होती. यामुळें त्यांचेकडून देवस्थानची व्यवस्था नीट होईना. अशा वेळीं त्या घराण्याच्या मुख्य मानास यत्किंचित् धक्का न लावतां देवस्थानची व गांवकीची व्यवस्था कित्येक वर्षे शास्त्रीबोवांनीं फार उत्कृष्ट रीतीनें चालविली. शास्त्रीबोवा गांवकीचे सभेंत असले म्हणजे सभेचें काम शांत व अत्यंत व्यवस्थितपणें पुरें व्हावयाचेंच. त्यांच्याशीं मतविरोध प्रदर्शित करण्याची बुद्धिच सहसा कोणास होत नसे. म्हणजे लोक नाखुषीनें किंवा त्यांच्या जरबेनें मुके बसत असें नव्हे. ते श्रीमंत नव्हते व पंडितहि नव्हते. किंवा खेडेगांवांतून कित्येक दीर्घद्वेष्ट्यांची भीति वाटावी असेंहि हिंसक लक्षण त्यांच्या ठिकाणीं नव्हतें. लोकांस त्यांच्या संबंधीं प्रेम आणि आदर वाटावा, अशी त्यांची सरळ व साधी वृत्ति असे. त्यांची कामाची टापटीपच अशी असे कीं, ती दुसरी कोणास साधणार नाहीं. हें सर्वांस पटून सर्व त्यांच्यापुढें नम्र असत. शास्त्रीबोवांच्या उदाहरणावरून आणखी एक धडा घेण्यासारखा आहे, तो

हा कीं लोकांचीं मनें आकर्षित करण्यास बहुभाषपणा अवश्य नसतो. शास्त्रीबोवा मितभाषी होते. कार्यकर्ती माणसें अशींच असतात. शास्त्रीबोवा केवळ ब्रह्मवृदांचीच वरील प्रकारची श्रेष्ठ सेवा करीत होते, असें नव्हे तर त्यांनीं एकट्यांनीं त्यावेळीं गांवांतील लायब्ररीचीहि व्यवस्था आपलेकडेच घेतली होती. त्यांचें हिशेबी लिहिणें त्यांच्या जमाखर्चांत चोख आहे. त्यांनीं त्या काळीं जी लायब्ररी संभाळली ती त्यानंतर आतांच्या पुढारलेल्या काळांत कित्येक वर्षें झालीं पनवेलीस राहिली नाहीं, ही गोष्ट केवळ तुलनेकरितां येथें कष्टानें नमूद करावी लागत आहे.

शास्त्रीबोबा केवळ ब्राह्मण मंडळींतच लोकप्रिय होते असें नव्हे. पनवेलचे त्यावेळचे लिंगायत पुढारी कै० विठोबा शेट ह्यांना माणसांची उत्तम पारख असे व ते शास्त्रीबोवांची योग्यता जाणून असत. शास्त्रीबोवा धूर्त आहेत असें ते म्हणत. मुसलमान, पारशी आणि इस्रायल अशा परधर्मी लोकांतहि शास्त्रीबोवांची वैद्यकीय गिऱ्हाईकी होती. शास्त्रीबोवा वारले, तेव्हां पनवेलचे व्यापारी व उद्मी लोकही 'एक हिरा गमावला!' असें म्हणून फार हळहळले! त्यांचे मरणाचे अगोदर थोडेच दिवस पनवेलच्या म्युनिसिपालटीतर्फें मुलांचा बक्षिससमारंभ मामलेदार कचेरींत झाला. त्यांवेळीं मामलेदार यांच्या सूचनेवरून शास्त्रीबोवा सभेचे अध्यक्ष झाले. त्यांनीं आपल्या लहानशाच भाषणांत शिक्षणाच्या अनास्थेकडे लोकांचें लक्ष वळवून लोकांस असेंहि बजावलें कीं, "आज जो आपणां सर्वांचे ठिकाणीं उत्साह दिसत आहे, ही स्थिति अशाच प्रकारें वृद्धिंगत करण्याला केवळ सरकारवरच अवलंबून राहाणें इष्ट नाहीं."

शास्त्रीबोवांच्या नागरिकत्वाचें येथपर्यंत वर्णन केलें. तें एक या चरित्राचा भाग म्हणून येथें असणें योग्यच झालें. परंतु मला या

वर्णनाचा येथें दुसराच उपयोग करून घ्यावयाचा आहे, तो हा कीं हें केवळ नागरिकत्व पुढल्या महत्कार्यास पुरेसें नव्हतें. त्यास निराळयाच व्यक्तिमाहात्म्याची गरज होती. ज्यांचें चरित्र मी लिहीत आहें, ते विष्णुशास्त्री आणि त्यांचे वडील कृष्णशास्त्री यांचेमध्यें एक प्रकारें चिपळूणकर, विष्णुशास्त्री व कृष्णशास्त्री यांच्याप्रमाणेंच अंतर होतें. कृष्णशास्त्री चिपळूणकर विद्वान होते. पण विष्णुशास्त्र्यांचें व्यक्तिमाहात्म्यच महाराष्ट्राच्या पुनर्रचनेस कारण झालें. तें कार्य कृष्णशास्त्र्यांकडून होण्यासारखें नव्हतें. हा प्रकार पुराणिक विष्णुकृष्णांतहि दिसून आला. त्याचें वर्णन पुढें करूं.

**धृतिर्दाक्ष्यं संयमो बुद्धिरात्मा**
**धैर्यं शौर्यं देशकालाप्रमादः ।**
**अल्पस्य वा बहुनो वा विवृद्धौ**
**धनस्यैतान्यष्ट समिन्धनानि ॥**

महाभारत, १२।१२०।३७.

[ संथपणा, दक्षता, मनोनिग्रह, बुद्धिमत्ता, विचारशीलता, धैर्य, शौर्य, आणि स्थलकालाविषयीं सावधगिरी हीं आठ मूळचें थोडें किंवा पुष्कळ असलेलें धन वाढविण्याचीं साधनें होत. ]






## जन्माध्याय.

**सजयति सिंदुरवदनो देवो यत्पादपंकजस्मरणम् ।**
**वासरमणिरिवतमसां राशीन्नाशयति विघ्नानाम् ॥ १ ॥**

स्वस्ति श्रीनृपशालिवाहन शके १७८६ रक्ताक्षी नाम संवत्सरीं ज्येष्ठ वा। १२ गुरुवारीं सूर्योदयानंतर बात्रीस घटका व पंचवीस पळांनीं पनवेल तालुक्यांत पळस्पें येथें कै० हरि सखाराम ओझे नामक आपल्या मातुलाचे गृहीं माझे चरित्रनायक कै० विष्णु कृष्ण पुराणिक यांचा जन्म झाला. कृष्णशास्त्री यांचें हें पहिलें अपत्य होय. त्यांची जन्मकुंडली अशी आहे—




नवयुगाच्या विचारक्रान्तींत जीं जुनीं मतें आधुनिक विद्वानांनीं टाकाऊ म्हणून गणलीं, त्यांत फलज्योतिषावरील विश्वास याचाहि अंतर्भाव होतो. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या निबंध-

मालेंत लोकभ्रम या मथळ्याखालीं फलज्योतिषावरील आपला अविश्वास सविस्तर रीतीनें लोकांपुढें मांडला. आर्यसंस्कृतींतील प्राचीन मतें केवळ युक्तिवादानें कोणतींच पूर्णपणें सिद्ध होत नाहींत. त्याप्रमाणेंच फलज्योतिष हा विषय आहे. परंतु अज्ञेयवाद्यांचा युक्तिवाद ज्याप्रमाणें अपरोक्षानुभूतिपुढें फिक्का पडतो, त्याप्रमाणेंच फलज्योतिषाविषयीं असलेला बिनतोड युक्तिवाद हजारों लोकांच्या अनुभवामुळें व्यर्थ ठरतो. फलज्योतिष तंतोतंत जमतें असें फार करून घडत नाहीं हें खरें. परंतु तें सर्वच जमत नसलें तरी तें सर्वच चुकतें असेंहि फार करून होत नाहीं. यामुळें ज्या गोष्टी तंतोतंत जमतात त्या तरी कां जमाव्या हा प्रश्न उरतोच. फलज्योतिष हें याप्रमाणें एक अपूर्ण शास्त्र आहे असें म्हणतां येईल; व कदाचित् तें यापुढें केव्हांही पूर्ण निर्दोष व बिनचूक होणें अशक्यप्रायहि ठरेल. अशा ह्या आनिश्चित स्थितींत जगांत जीं अनेक आश्चर्यें आहेत, त्यांपैकींच फलज्योतिष हें एक महदाश्चर्य आहे इतकेंच म्हणतां येईल. याहून त्या शास्त्राचा जास्त व्यावहारिक उपयोग निःशंकपणें करतां येऊं नये यांतच ईशनियतीचें गूढ–रहस्य असेल. या वादग्रस्त विषयाचा सांगोपांग विचार येथें करतां येणार नाहीं; तथापि ज्या अर्थीं फलज्योतिषावर विश्वास ठेवणारे व न ठेवणारेहि फलज्योतिष पहातच असतात, त्याअर्थीं फलज्योतिषाप्रमाणें या चरित्राची मांडणी कशी बसते तें स्थूल मानानें येथें दाखविणें अयुक्त होणार नाहीं. म्हणून विशेषेंकरून भृगुसंहितेच्या आधारें वरील कुंडलीचें भवितव्य अगोदरच काय ठरलें होतें, तें पाहूं. रामायणापूर्वींच ज्याप्रमाणें वाल्मिकीनें रामायण लिहिलें, त्याप्रमाणें हा एक विलक्षण प्रकार आहे.

भृगुसंहितेंत या कुंडलीचें जें भविष्य दिलें आहे, त्यांतील कांहीं ठळक मुद्दे असे आहेतः—( १ ) वर्ण निमगोरा, ( २ ) स्वोद्योगानें

व्यापारांत धनप्राप्ति, ( २ ) धंदा वैद्यकी व त्यांतच द्रव्यप्राप्ति, ( ३ ) शिवोपासक, ( ४ ) गृहें बांधणारे, ( ५ ) श्रीशिव-सद्गुरूंचे उपासक, ( ६ ) पुत्र व सहोदर यांचें सुख अल्प, ( ७ ) द्विभार्यायोग, एक एकोणीस वीस वर्षांचे सुमारास आणि दुसरा छत्तीसावे वर्षांचे सुमारास, ( ८ ) वृद्धिविकारापासून पीडा, ( ९ ) मितवक्ता, ( १० ) दाता, (११) चंचल मन, ( १२ ) विद्या मध्यम, प्रथम वीस वर्षांचे आंतच विद्यासमाप्ति पुन्हा २१ ते २८ वर्षांचे दरम्यान स्थलांतरानें अल्पकाळ विद्याभ्यास सुरू, ( १३ ) पंचवीसावे वर्षापासून सन्मित्रांच्या संगतीनें वैद्यकीय धंद्यास विशेष जोरानें सुरुवात, धनलाभ, कीर्ति, परमार्थबुद्धि इ. **भिषक्कर्मस्यचारंभो धनलाभो विशेषतः ॥ सत्संगत्या सुखं चैव परमार्थे मतिस्तथा** ॥ ५५ ॥ [भृ. सं. ]. ( १४ ) दासदासी सुख पुष्कळ, ( १५ ) बत्तिसावे वर्षांचे सुमारास–" **परिवार जनात्सौख्यं स्वोद्योगेयशमाप्नुयात्** ॥ " ( १६ ) त्यानंतर पसतीसावे वर्षांचे सुमारास–" **षष्ठस्थाने कुजेचैव बृहत्वृषणता भवेत् । सद्गुरोश्च कृपादृष्ट्या ज्ञाननिष्ठो भविष्यति** ॥ ६१ ॥ " भृ. सं. ( १७ ) जलभूमि लाभ, ( १८ ) दानधर्मांत विशेष द्रव्यव्यय, ( १९ ) ४२ वे वर्षाचे सुमारास पूर्वपापाचे निष्कृतीनंतर शिवगुरुकृपेनें पुत्रप्राप्ति, ( २० ) त्याच सुमारास मातापित्यांस धोका, (२१) उद्योगांत दक्षता, परमोत्कर्ष–" **धनलाभो विशेषेण भाग्यवृद्धिर्दिने दिने । उद्योगेचातिदक्षश्चसंततेःसौख्यभाक्भवेत्** ॥ ८३ ॥ **धनसंग्रहयोगोवै हेमरत्नादिसंग्रहः । दासदासीसुखं पूर्णं परिवारसुखो भवेत्** ॥ ८४ ॥ भृ. सं. ( २२ ) अखेर, **शून्यबाण मिते वर्षे** ( ५० वे वर्षी ) **देहे पीडा भविष्यति । वातज्वर-महत्पीडा मृत्युंजयविधिं चरेत् आरोग्ययंत्रयोगेन दीर्घायुष्यं भविष्यति** । ॥ ८७ ॥

हा विघ्नपरिहार घडला नाहीं. यामुळें या चरित्राचा पुढील सत्तावीस वर्षांचा भृगुसंहितेंतील कथाभाग भृगुसंहितेंतच राहिला ! तथापि वर दिलेल्या निदान बावीस गोष्टी तंतोतंत पुढें घडून आल्या, हें कांहीं लहानसहान आश्चर्य नव्हे.

ह्या कुंडलीसंबंधीं फलज्योतिषशास्त्रांतील कांहीं युक्तिवाद पुढें देत आहें. कुंडलींतील जीं उलाढालीचीं स्थानें लग्न, धन, भाग्य, कर्म, आय, आणि पराक्रम या स्थानांवर घडलेला ग्रहयोग व दृष्टियोग चमत्कारजनक आहे.

ही कुंडली पंचमहापुरुष योगांत जमा होते. गुरूमुळें स्थूलदेह. शुक्रलग्नेश यामुळें मेद व मेदविकार. बुध–शुक्रयोग व चंद्र उच्चीचा यामुळें बुद्धि तीव्र व प्रबळ कार्यकारी. लग्नीं गुरु व नवमांत शुक्र यामुळें सत्समागम होणें व सत्कार्यें घडणें. पूर्वसंपादित धन अल्प. भातृसुख मध्यम. गुप्त शत्रू असले तरी त्यांचें कांहीं न चालणें. चंद्र उच्च असून बुध-शुक्र-गुरु दृष्ट असल्यामुळें रासायनिक द्रव्यांनीं भाग्योदय. शुक्रयुक्त बुध स्वगृहिं नवमांत असून गुरूनें पूर्ण दृष्ट आहे, यामुळें ज्योतिष–वैद्यक या विषयांत गति असावी. मंगळ तनुधनस्थानांना पूर्ण पहात असून शनिमंगळाचा षडष्ट योग आहे, यामुळें मोठी तोहमत येऊन त्यांत खर्च व्हावा व गुरूच्या मंगळावरील पूर्ण दृष्टीमुळें त्यांतून निर्विवाद पार पडावें, पराक्रमेश लग्नस्थ, लग्नेशाशीं कोन व दृष्टयोग, लग्नेशाची पराक्रमावर पूर्ण दृष्टि, यामुळें स्वपराक्रमानें उदय. तसेंच भाग्येश भाग्यस्थानीं, स्वगृहीं, पराक्रमेशानें पूर्ण दृष्ट असल्यामुळें पराक्रम इतक्या जोराचा कीं हातीं माती घेतली तर त्याचें सोनें व्हावें. असे या कुंडलींतील निरनिराळ्या योगांबद्दल ज्योतिषशास्त्राचे युक्तिवाद आहेत. त्याचा तज्ज्ञ वाचकांनीं विचार करावा.

भृगुसंहितेच्या प्रामाण्यासंबंधीं एक ठळक शंकास्थळ आहे, तेंहि येथें नमूद करणें जरूर आहे. भृगुसंहितेंत या जन्माचें भविष्य सविस्तर वर्तविलेलें असतें. त्याचबरोबर पूर्वजन्मीचें व पुढील जन्माचें वर्णन एक दोन ओळींतच त्रोटक केलेलें असतें. त्यांत पूर्वजन्म व पुढील जन्म कोणत्या गांवचा व कोणत्या जातीच्या कुटुंबांत याचा स्पष्ट उल्लेख असतो. हीं गांवाचीं नांवें बहुधा काशी, अयोध्या अशींच पुराणप्रसिद्ध असतात. पण मौज अशी कीं या जन्मीं कोणत्या गांवीं कोणत्या कुळांत जन्म झाला, त्याचा मात्र कधींच उल्लेख नसतो. याचा योग्य खुलासा जर झाला नाहीं तर पूर्वजन्म व पुढील जन्म सांगणें ही एक धंदेवाईक फसवेगिरी आहे, असेंच कोणासहि वाटण्याचा संभव आहे.

फलज्योतिष व त्याच्या सत्यतेंत अंतर्भूत होणारे अनेक सिद्धांत लक्षांत घेतले तर दैववाद व प्रयत्नवाद या अनादिकालापासून चालत आलेल्या वादांत, दैववादाला मोठाच दुजोरा मिळतो. पण फलज्योतिषशास्त्रांत जे संकटपरिहाराचे उपाय सांगितलेले असतात, ते उपाय म्हणजे धंदेवाईकांची फसवेगिरी नसेल, तर पुन्हां दैववाद खरा कीं प्रयत्नवाद खरा हा प्रश्न राहातोच. शिवाय शनीच्या जपानें शनीच्या गतींत फेर बदल करणें अशक्य दिसतें. कारण तसें शक्य मानल्यास आम्ही शनीला अनुकूल करून घेतांना तो अनेकांना उगाच प्रतिकूल होऊन अनर्थ होईल. यामुळें परिहाराचा युक्तिवाद लक्षांत येत नाहीं. या शंकेचें कोणी असें समाधान करितात कीं, पाऊस पडणें न पडणें हें आपल्या हातीं नसलें तरी पाऊस पडूं लागल्यास छत्री उघडून त्याचेपासून आपलें निवारण करणें, आपले हातीं असतें. त्याचप्रमाणें शनिग्रह जर अनिष्ट स्थानीं आला, तर त्याचा परिणाम व्हावयाचा तो होईलच, परंतु परिहारांनीं त्या परिणामा-

पासून वरील छत्रीच्या दृष्टांताप्रमाणें आपल्याला आपलें रक्षण करितां येईल.

फलज्योतिषावर जे दुसरे शास्त्रीय आक्षेप येत असतील,त्यांशिवाय सर्वसामान्य जनांना असे आक्षेप येतात कीं, फलज्योतिषाचे वर्णनांत जितक्या भूतकालीन गोष्टी जमतात, तितक्या भविष्यकालच्या जमत नाहींत,तसेंच एकाच लग्नावर एकाच प्रांतीं अनेक मुलें जन्मास येण्याचा संभव असतां, त्यांचें भवितव्य तंतोतंत जुळणें शक्य नसतें.

जीवाजीवाचे ठिकाणीं जी विषमता दिसते, त्यावरून प्रत्येकाचें प्रारब्धकर्म भिन्न असलें पाहिजे, हें उघड आहे. तें प्रारब्धकर्म कोठें-तरी बीजरूपानें संग्रहित असलें पाहिजे. असें बीजरूपानें अव्यक्त असलेलें प्रारब्ध कर्म त्याच्या फलासह त्रिकालज्ञांना जाणतां येणें शक्य असावें. ज्या अर्थी व्यष्टि म्हणजे जीव हा समष्टींतलिच एक अंश आहे, त्या अर्थी समष्टीचक्राच्या गतींत त्याची गति निश्चित व निगडित असली पाहिजे. व ती गती॰काय हें अनुमानानें जाणण्याचीं साधनें समष्टींत असलीं पाहिजेत. कर्माचे भोग इतकेंच काय पण कर्माच्या वासना देखील पूर्व प्रारब्धानुसारच होत असल्या पाहिजेत. सृष्टीचे नियम व त्याचीं फलें अटल आहेत, अशाच भरंवशावर जगां-तील व्यवहार सुरू आहेत. व भौतिक शास्त्रांची उभारणी होत आहे. याप्रमाणें नियतिवाद अथवा दैववादाचा युक्तिवाद करतां येतो, या दैव-वादांत प्राप्त परिस्थिति, अनुवंशिक संस्कार, देशकालस्थिति, इत्यादि अनेक अंशाचे विचार येतात.

उलट धर्मशास्त्र, ज्योतिषशास्त्र, अध्यात्मशास्त्र, नीतिशास्त्र, हीं सर्व शास्त्रें प्रयत्नशील आहेत. जर मनुष्याच्या हातांत अमुक करावें व

---

(१) अधिष्ठानं तथा कर्ता करणंच पृथक् विधम् ।
विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पंचमं ॥ गीता

अमुक न करावें हें कांहींच नसेल तर शास्त्रांची प्रवृत्ति व्यर्थ ठरेल. सारें जग प्रयत्नशील दिसत आहे. गाईच्या सडांत दूध असलें तरी तें काढल्याशिवाय मिळत नाहीं, असें प्रयत्नाचें अगत्य आहे.

पुन्हां,साऱ्या समष्टीचा नियंता जो सर्व शक्तिमान व दयाळू ईश्वर, तो जर प्रसन्न होईल, तर त्यास जीवाचें प्रारब्ध आणि सृष्टीचे नियम यांस मुरड घालणें, मुळींच अशक्य नसावें, असा ईश्वरवादाचा महिमा आहे.

आणि अखेर जें 'जांलेंचि नाहीं, त्याची वार्ता पुसशी कायी ॥ ? ' हा अजात सिद्धांत आहे.

यांपैकीं अजात सिद्धांताप्रमाणें प्रारब्ध व पुरुषार्थ दोन्हीहि कल्पना फोलच आहेत. कारण आत्मदृष्टीनें जग, जीव, ईश्वर कांहीं झालेंच नाहीं. आतां, व्यावहारिक दृष्टीनें विचार करितां,

**उदक, अग्नि, धान्य झाल्या घडे पाक।**
**एकावीण एक कामा नये ॥**

या म्हणण्याप्रमाणें प्रारब्धवाद, प्रयत्नवाद व ईश्वरवाद या तिघांपैकीं कोणासच निरपेक्ष स्वातंत्र्य नाहीं, असें म्हणावें लागतें. कोणतेंहि कर्म घडण्यास ईश्वराकडून सत्ता, स्फूर्ति, ज्ञानप्रकाश लागतो. प्रारब्धाची अनुकूलता असेल तरच तें कर्म घडतें, आणि शेवटीं तें कर्म घडलें तरी कर्तृत्वाचा अभिमान धरणें, न धरणें हें जीवाकडेच असतें. तात्पर्य, परिस्थिति ईश्वराधीन, शारीरिक क्रिया दैवाधीन, आणि अहंता ममता इत्यादि मानसिक क्रिया पुरुषाधीन असेंच स्थूल मानानें मानण्याची पद्धति दिसते. परमार्थतः हा साराच भ्रम आहे.

**न कश्चिज्जायते जीवो संभवोऽस्य न विद्यते।**
**एतत्तदुत्तमं सत्वं यत्र किंचिन्न जायते ॥**

गौडपादीय कारिका ३।४८

[ कोणताहि जीव उत्पन्न होत नाहीं. कारण त्याचा संभव ( कारण ) विद्यमान नाहीं. ज्या अज ब्रह्मामध्यें कांहींहि उत्पन्न होत नाहीं, हें सर्व सत्यांत उत्तम सत्य आहे. ]

तथापि व्यावहारिक दृष्टीला हें सत्य पटणें अशक्य आहे. यास्तव व्यावहारिक दृष्टीला फलज्योतिष आणि दैववाद हा अजूनहि एक चिंतनीय विषय आहे. तो कोणाला युक्तिवादानें पटत नाहीं व खोटाहि म्हणवत नाहीं, असें तें एक गूढ आहे. ह्या गूढाप्रमाणेंच आजचें शिक्षण व त्याची फलश्रुति हें एक प्रयत्नवादांतील गूढच आहे. अथवा हा एक जबरदस्त व्यामोह आहे. त्याचा विचार कथानुक्रमानें पुढील प्रकरणांतून करूं.

**सुमन्त्रिते सुविक्रान्ते सुकृते सुविचारिते ।**
**सिध्यन्त्यर्था महाबाहो दैवं चात्र प्रदक्षिणम् ॥**

म. भा. ३।३६।७

युधिष्ठिर भीमसेनाला म्हणतो:—

[ हे महाबाहो, चांगल्या तऱ्हेची सल्ला मसलत, चांगल्या तऱ्हेचा पराक्रम, चांगल्या तऱ्हेचा विचार आणि चांगल्या तऱ्हेचें कर्तृत्व यांच्या योगानें मनोरथ सिद्धीस जातो; परंतु या ठिकाणीं दैवाचीहि अनुकूलता असावी लागते. ]





# प्रकरण ८ वें

## बालपण व शिक्षण.

जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच ।

वामन.

माझ्या चरित्रनायकांचा जन्म पनवेल जवळच पळस्पें येथें त्यांच्या आजोळीं झाला. कृष्णशास्त्री यांच्या पुत्रसंततीपैकीं सर्वांत वडील तेच. त्यांचें आजोळ चांगलेंच सुखवस्तु होतें. विष्णु कृष्ण यांचे मातामह सखारामपंत ओझे हे बडोद्यास गायकवाडींत नोकर होते. लवकरच त्यांनीं आपले बंधु गणेशपंत यांसही बडोद्यास नेलें. ते गणेशपंत आपल्या अक्कल हुषारीनें श्री. खंडेराव गायकवाड यांचे दिवाण झाले. विष्णु कृष्ण यांच्या जन्माच्यावेळीं हें दिवाणाचें घराणें सारें एकत्रच होतें. श्रीमंत खंडेरावांचें गणेशपंतांवर विशेष प्रेम असे. आमच्या दिवाणांचा वाढा आमच्या वाड्याप्रमाणें प्रशस्त व भव्य असला पाहिजे, असा त्यांचा इरादा होतांच, बडोद्यास महमदवाडींत गणेशपंतासाठीं फार मोठा वाडा बांधण्यांत आला. त्यांतच एका भागांत श्रीगणपतीचें मंदिर आहे. त्याचप्रमाणें त्यांच्या पळस्पें येथील विस्तृत वाड्यांत एका भागांत श्रीराम मंदिर आहे. या दोन्ही देवांचें श्रीमंती ऐश्वर्य पाहिलें म्हणजे यजमानांच्या संपन्नतेची सहज कल्पना होते. श्रीमंत खंडेराव यांची ज्याप्रमाणें गणेशपंतांवर बहालमर्जी असे, त्याप्रमाणें बंडांत इंग्र-

जांची बूज राखल्याबद्दल इंग्रज सरकारवरहि ओझ्यांच्या उपकारांचें ओझें होतें. त्यांतून उतराई होण्यासाठीं त्यांनीं गणेशपंतास पनवेल तालुक्यांतील तीन गांव इनाम दिले. अशा ह्या श्रीमान् इनामदारांच्या वाड्यांत विष्णु कृष्ण यांचे बालपणचे कांहीं दिवस गेले. घरची गरीबी व आजोळची श्रीमंती यांतील सुख, ऐष, आराम यासंबंधीं फरक ठळकच होता. परंतु विष्णु कृष्ण या आजोळच्या ऐश्वर्यास दिपले नाहींत. आतां त्यांच्या पुढील असामान्य महत्त्वाकांक्षेला हे बाळपणचे ऐश्वर्याचे संस्कार कारणीभूत झालेच नसतील, असें म्हणवत नाहीं. तथापि त्या संस्कारांनीं त्यांना ऐदी किंवा मिजाशी केलें नाहीं. उलट त्यांची घरची राहाणी अव्वलपासून अखेरपर्यंत अत्यंत साधी असे. त्यांच्या आजोळचीं मुलें सोनें-मोतीं-जवाहिर यांनीं सदां सजलेलीं असलीं, तरी विष्णु कृष्ण यांच्या बालपणीं त्यांच्या अंगावर एक फुटका'मणीहि नसे.आणि आजोळचीं लहान मोठीं माणसें जरतारीवांचून वस्त्रच वापरीत नसले तरी विष्णु कृष्ण यांची जगन्नाथी कधीं सुटली नाहीं. त्यांच्या मुंजींत त्यांना भिक्षावळीचें कांहीं सोनें मिळालें असावें असें दिसतें. पण काय योगायोग असेल तो असो, ज्यावेळीं त्यांच्या किंवा त्यांच्या वडिलांच्या मनांत पुढील आर्यौषधि कारखान्याची कल्पनाही येणें शक्य नव्हतें, अशा वेळीं सन १८७४ सालीं हें त्यांचें सोनें कृष्णशास्त्री यांनीं वैद्यकी खात्याकडे रसायन करण्यासाठीं उपयोगांत आणलें. त्यांचे भिक्षावळीचे रोख पैसेहि त्यांच्या आईजवळ होते, तेहि कारखान्याच्या बाल्यावस्थेंत त्याच्या भांडवलाकडे उपयोगांत आणले, असें ते पुढें म्हणत असत. माझ्या चरित्रनायकांस पुढें भावंडें झालीं, तेव्हां त्यांचें नांव विष्णु तात्या असें पडलें. त्याचेंच पुढें तात्या व तात्यासाहेब असें रूपांतर झालें. कृष्णशास्त्री यांच्या जमाखर्चांत विष्णुतात्याला पुस्तक विकत घेतलें, विष्णुतात्यास मिळालेली दक्षणा

जमा केली, असे त्यांच्या नांवाचे ठिकठिकाणीं उल्लेख आहेत. शिवाय हे विष्णुतात्या लहानपणापासून ‘ विष्णु ’ अगर ‘ विष्ण्या ’ असे संबोधण्यासारखे हूड व उनाड नव्हते. बालपणींहि त्यांची वृत्ति शांत व गंभीर असे.

तारीख २ आगस्ट सन १८७२ रोजीं त्यांचें शाळेंत नांव घातलें, व तारीख ११ एप्रिल सन १८७८ रोजीं त्यांनीं शाळेंतून नांव काढलें. ते त्या वेळच्या सरकारी शाळेंत मराठी पांच इयत्ता शिकले. सहावी इयत्ता त्यांचे पंतोजी बाळाजी नारायण ओक हे खाजगी रीतीनें शिकवीत असत. त्यावेळीं ते १२।१३ वर्षांचे होते. त्यानंतर ते रमाकांत थत्ते यांचे जवळ इंग्रजी तीन इयत्ता शिकले. सन १८७८ सालीं त्यांचें शिक्षण संपलें. वर्गात चांगले बुद्धिमान म्हणून ते गणले जात. त्यांची आपल्या सहाध्यायांशीं वर्तणूक फार प्रेमाची असे. विष्णु कृष्ण कानिटकर एंजिनीअर, कृष्णाजी गणेश अभ्यंकर व सदाशिव धर्माजी पडवळ हे त्यांचे बाळपणचे सहाध्यायी होते. यांपैकीं कानिटकर हे पुढें एल. सी. ई. झाले, आणि कृष्णाजी गणेश अभ्यंकर व सदाशिव धर्माजी पडवळ यांनीं चतुर्थाश्रम घेतला. विष्णु-तात्या आज हयात असते, तर तेहि यावेळीं चतुर्थाश्रम घेण्याचे बेतांत असते. कदाचित् त्यांनीं यावेळीं चतुर्थाश्रम घेतलाहि असता. आपण अखेर चतुर्थाश्रम घेणार, असें ते मजजवळ अनेक वेळां म्हणाले होते. पण तशी वेळच आली नाहीं. परंतु मनुष्याची पारख त्याच्या स्नेह्या-वरून करितात, याप्रमाणें पाहातां हे त्यांचे बालमित्र सारखेच सत्वस्थ होते, असें दिसतें.

त्यावेळीं शाळेचे हेडमास्तर गणपतराव भिडे या नांवाचे एक गृहस्थ होते. पुण्याचे सुप्रसिद्ध रा. ब. विष्णु मोरेश्वर भिडे व हे गण-पतराव एकाच कुटुंबांतील होत. गणपतरावांची ‘ मारकुटे मास्तर ’

म्हणून फार प्रसिद्धि असे. पूर्वींच्या काळीं मुलांना काठीनें मारणें, त्यांस आंगठे धरण्यास लावणें, खुर्ची सारखे भिंतीला टेकून तास तास अर्धवट उभें करणें, कोलदांडी देणें, वगैरे कडक शिक्षा करीत असत. याच तालमींतले गणपतराव भिडे मास्तर हे असावेत, असें दिसतें. उलट बाळाजी नारायण ओक आणि रमाकांत थत्ते हे गुरुजी तसे नसावेत, असेंहि वाटतें. तात्यांचे बोलण्यांत या दोन्ही गुरुजींचा व तिसरे मोरो गणेश लोंढे मास्तर यांचा फार प्रेमादर पूर्वक उल्लेख येत असे. रमाकांत थत्ते यांचाहि विद्यार्थ्यांवर धाक फार असे, असें म्हणतात. या गुरुजींपैकीं बाळाजी नारायण ओक यांना पुढें आपल्या कारखान्यांत जमाखर्ची लिहिण्यावर ठेवून तात्यांनीं आपली कृतज्ञता-बुद्धि सक्रिय व्यक्त केली. रमाकांत मास्तर यांनीं पुढें वकिलीचा अभ्यास करून ते वकील झाले व यवतमाळ येथें वकिलीचा धंदा करूं लागले. तरी पण त्यांचा व तात्यांचा संबंध तुटला नाहीं. औषधांसाठीं किंवा अन्य कारणास्तव, त्यांचा व्यवहार अखेरपर्यंत चालूच होता. मोरो गणेश लोंढे यांचा व तात्यांचा प्रेमादरसंबंध अखेरपर्यंत कायम होता. तात्पर्य, ज्यांना त्यांनीं एकदां आपलें म्हटलें, त्यांना ते सहसा अंतर देत नसत. यास पुढें कांहीं अपवादहि घडले. पण त्याचें कारण दोन मानी पुरुषांचें सहसा पटत नाहीं, हेंच दिसतें.

तात्या पंधरा वर्षांचे झाले, तेव्हां त्यांचा शिक्षणक्रम संपला. जास्त शिकण्याची पनवेलीस सोयच नव्हती. त्यानंतर वडिलांजवळ व सखारामशास्त्री यांचे जवळ त्यांनीं वैद्यकीचा अभ्यास थोडा फार केला. सन १८८३ सालीं तात्यांचें पहिलें लग्न झालें. पुण्याचे सुप्रसिद्ध वैद्य अप्पाराव वैद्य यांचे जामात त्र्यंबकराव चांदोरकर हे पनवेलच्या मामलेदार कचेरींत अव्वल कारकून होते. त्यांनीं आपली मुलगी तात्यांना दिली. हें लग्न चांगलें थाटांत झालें, असें म्हणतात. तात्यांचे

एक मेव्हणे हरिभाऊ चांदोरकर सरकारी डॉक्टर होते व दुसरे दिन-करपंत चांदोरकर फर्ग्युसन कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर होते. तिसरे अनंतराव चांदोरकर हे पुढें तात्यांचे कारखान्यांत एजन्सीचे खात्यावरील एक मुख्य कारकून होते.

तात्यांचें लग्न झाल्यावर त्यांनीं कृष्णशास्त्री व सखारामशास्त्री यांच्या वैद्यकीच्या धंद्यांत थोडी फार मदत करण्यास सुरवात केली. तात्यांचें अंतःकरण म्हणजे अनेक विसंगत गुणांचें संपुट होतें. साऱ्या जगाच्या उलाढालींत त्यांचें मन गुंग होऊन जाई. पण त्यांच्या ठिकाणीं साधा सभाधीटपणाहि नव्हता.ते महत्त्वाकांक्षी व साहसीहि होते; पण त्यांचें अंतःकरण फारच मृदु व भीरु असे. रोग्याचे क्लेश व त्याची मरणोन्मुख स्थिति त्यांच्यानें पाहावत नसे. ते त्याची करुण कथा समक्ष जाऊन ऐकण्यास खुषी नसत. या त्यांच्या स्वभावांतील दोषामुळें आणि उलट महत्त्वाकांक्षेच्या गुणामुळें त्यांनीं आर्यवैद्यकीचे उत्कर्षाचे कामीं कोठें प्रचारकार्य केलें नाहीं. वैद्यकीचे धंद्यापैकीं रोग चिकित्सेपेक्षां औषधि जास्त प्रमाणांत शास्त्रोक्त तयार करून त्या वडिलांस व सखारामशास्त्री यांस पुरविणें हें काम त्यांनीं आपलेकडे घेतलें, व ते त्या उद्योगाला लागले. मुंबईहून औषधि वगैरे जिन्नस आणावे, आतकरगांवीं जाऊन तेथील जंगलांतून वनस्पति मिळवून कांहीं भट्ट्या लावाव्या, पनवेलीसही ओषधि तयार करण्याची निर-निराळीं उपकरणें तयार करावीं, या खटपटींत ते सदा गुंतलेले असत. पनवेलचे विठोबा खंडाप्पा शेट यांचा पुराणिकांना चांगला आधार असे, हें वरतीं लिहिलेंच आहे. एकदां कृष्णशास्त्री यांनीं आमचे उद्योगास भांडवल पाहिजे आहे म्हणून सहा सुंदर प्रासादिक आर्यांत विठोबा शेट यांस विनंति केली. विठोबा शेट विद्वज्जनांचे मोठे चहाते होते. त्यांनीं लगेच शास्त्रीबोवांकडे शंभररुपये पाठविले. विठोबाशेटकडे

महाराष्ट्रांतील बरीच प्रतिष्ठित मंडळी येत असे. ते आपल्या वडाळयावरील बागेंतून घरीं येत असतां हटकून अशा गृहस्थांसह शास्त्रीबोवांच्या घराकडे वळत. त्यावेळीं शास्त्रीबोवा मोठ्या कौतुकानें "आमच्या विष्णूनें हें केलें, आमच्या विष्णुतात्यानें तें केलें" असें येणाऱ्या गृहस्थांस दाखवीत असत. त्या वेळीं तात्या एकाच चिमणीखालीं निरनिराळ्या भट्ट्या लावतां याव्या म्हणून भट्ट्यांचे पात्रांस खालीं चाकें लावून, तीं वर्तुळाकार रूळांवरून फिरतीं राहावीं, अशी योजना करीत होते.

कृष्णशास्त्री यांची एक बहीण मुंबईस भास्कर हरि भागवत यांस दिली होती. गुरुवर्य राजारामशास्त्री भागवत व भास्करराव भागवत हे कुटुंबीय होत. या भागवतांकडे तात्या वरचेवर जात. तसेंच ते मुंबईचे अण्णा मोरेश्वर कुंटे यांचेकडेहि वैद्यक शास्त्रासंबंधीं सल्लामसलतीस जात असत. अण्णा मोरेश्वर कुंटे हे आर्य संस्कृतीचे मोठे अभिमानी असत. त्यांनीं आर्य वैद्यकाचाहि अभ्यास केला होता. त्यांच्याच प्रमाणें पुण्याचे गणेश कृष्ण गर्दे हेहि आर्य वैद्यकांत निष्णात होते. वाग्भटाचें भाषांतर त्यांनीं आपल्या देखरेखीखालीं करवून त्यास एक विस्तृत प्रस्तावनाहि जोडली आहे. पुण्यास कांहीं वर्षे राहून आर्यांग्ल वैद्यकीचा अभ्यास डॉ. गर्दे यांचेजवळ करावा अशी तात्यांची फार इच्छा होती व त्यासाठीं ते सन १८८८ सालीं पुण्यास जाऊन राहिलेहि होते. त्यापूर्वींहि त्यांचें पुण्यास जाणें येणें असे. या वेळीं पुण्यास त्यांच्या बरोबरीचे पनवेलचे दुसरे विद्यार्थि विष्णुपंत कानिटकर, घारोबा वैशंपायन, दत्तोपंत भिडे हे होते. हे स्नेही इंग्रजी सातव्या इयत्तेंत होते. सन १८८९ सालीं हे तिघे स्नेही पुण्यास बुधवार वाड्याच्या बागेंत बसून एक दिवस आपल्या आयुष्यांतील पुढील विचार करीत असतां तात्या आपल्या ग्रामस्थबंधूंस म्हणाले कीं:—" आपला वैद्यकीचा अभ्यास आतां लवकरच संपवावा लाग-

णार ! परंतु आपल्याला एका गोष्टीची तळमळ लागून राहिली आहे कीं, आपण जे मनांत मनोरे बांधले आहेत, ते मूर्त स्वरूपांत कसे आणितां येतील ? आपण विशेष कर्तृत्ववान् बनावें, आर्यौषधींचा मोठ्या प्रमाणांवर कारखाना काढावा, असें कांहीं दिव्य करून दाखवावें कीं लोकांनीं थक्क होऊन जावें ! हीं उद्दिष्ट उच्च ध्येयें गांठण्याकरितां साधनंसामुग्री पाहिजे ती कशी व कोणत्या प्रयत्नांनीं मिळवावी, याबद्दलचे विचार अलिकडे माझे मनांत घोळत राहिले आहेत व कधीं कधीं विचारांचें काहूर इतकें माजतें कीं मी किंकर्तव्यमूढ बनतों, अशी माझी सध्यांची स्थिति आहे. ”

तात्यांचें वय यावेळीं बावीस तेवीस वर्षांचें होतें. त्यांच्या शिक्षणाच्या वाढीपेक्षां त्यांच्या महत्त्वाकांक्षेची वाढ फार झपाट्यानें होत होती. त्यांच्या मनांतील मनोराज्यानें परिस्थितीच्या सीमा उल्लंघून फार पुढें आक्रमण केलें होतें. परंतु त्यांचें मन चंचल होतें व मर्यादशील होतें. यामुळें महत्त्वाकांक्षेचा हात धरून आपल्या भाग्योदयाचा मार्ग काढीत परिस्थितीस झिटकारून कोठें अनुकूल स्थळीं चालतें व्हावें, इतकें साहस त्यांच्यानें करवलें नाहीं. कृष्णशास्त्री हे संसारी होते. सखारामशास्त्री हे विशेष महत्त्वाकांक्षी नसावेत असें वाटतें. दोघांचें म्हणणें विष्णुतात्यांनीं घरींच असावें. त्यांची अमर्यादा करणें तात्यांना कठीणच होतें. तात्यांचें लग्न होऊन पांच वर्षें लोटलीं होतीं. लग्नांत बायको नऊ दहा वर्षांची असली तरी आतां ती वयांत आली होती. तिला घेऊन पुण्या–मुंबई सारख्या ठिकाणीं राहाणें सोपें नव्हे, हा त्यांनीं पुण्यास अल्पकाळ सहकुटुंब राहून थोडा अनुभव घेतला होता; व बायकोला पनवेलीस ठेवून आपण एकटेंच दूर राहाणें तात्यांच्या वयाला व वृत्तीला सोसण्यासारखें नव्हतें. यामुळें घरीं परत येऊन परिस्थितीच्या नजरकैदेंत जें करतां येईल तें करावें, याशिवाय त्यांस दुसरा मार्ग नव्हता.

जगाच्या उलाढालींत पडावें, अशी त्यांच्या मनाची धांव होती. पण त्यास जरूर ती विद्वत्ता व इतर साधनांची अलुकूलता मुळींच नसतां त्यांनीं अवाढव्य महत्त्वाकांक्षा बाळगणें, हें त्यांच्या सहाध्यायी मित्रांस उपहासास्पदच वाटलें. त्या काळीं इंग्रजी विद्येचें माहात्म्य फार होतें, व ती विद्या कृष्णशास्त्री व सखारामशास्त्री यांसच काय पण विष्णुतात्यांसहि अवगत नव्हती.

या जगांत चांगले विद्वानहि पढतमूर्ख ठरतात व अविद्वानहि कर्तृत्ववान होतात, असें पूर्वीपासून दिसून येतें. झाडाच्या जाड बुंध्या-प्रमाणें जाड्या विद्येवरच मानवी जीवनाची सफलता अवलंबून नसावी असें वाटतें. त्यामुळें सहजच असा प्रश्न उद्भवतो कीं, महत्त्व कशांत आहे ? पुस्तकीज्ञानांत कीं बुद्धिमत्तेंत ? डोक्यांत कोंबलेल्या विविध माहितींत कीं सृष्टीचें व सुव्यवहारांचें सूक्ष्मावलोकन करणाऱ्या दृष्टींत ? हा प्रश्न आहे.

**यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किम् ।**
**लोचनाभ्यां विहीनस्य दर्पणः किं करिष्यति ॥५३॥**

[ ज्यास स्वतःची बुद्धि नाहीं, त्यास शास्त्राभ्यास काय करूं शकणार ? कारण नेत्ररहित मनुष्यास आरसा काय कामाचा ? ]





# प्रकरण ९ वें.

## पदवीधरांची बेजारी
## व
## भांडवलशाहीची बेकारी.

नानुध्यायाद्बहूञ्छब्दान्वाचो विग्लापनं हि तत् ।[1]

बृहदारण्यक ४।४।२१

अलब्धं चैव लिप्सेत लब्धं रक्षेदवक्षयात् ।
रक्षितं वर्धयेत्सम्यग् वृद्धं दीनेषु निक्षिपेत् ॥[2]

प्र. सा. १०६६

आंज शंभर सवाशें वर्षें इंग्रजी विद्येनें हिंदुस्थानास मोहून टाकलें आहे. आमची संस्कृत विद्या आम्हांला नको, असें अव्वल इंग्रजीपासून आंजपर्यंत आपलेच विद्वान म्हणत आले आहेत. राजा राममोहन-पासून आम्हांला इंग्रजी विद्या शिकवा ही आमची मागणी, आणि त्याप्रमाणें शिकविल्यास गुरूची विद्या गुरूलाच फळावयाची ही इंग्र-

[ १ ] पुष्कळ शब्दांचें अनुध्यान करूं नये. कारण तें वाणीचा अपव्यय आहे.

[ २ ] द्रव्य मिळालें नाहीं तोंपर्यंत त्याची इच्छा करावी. मिळालेल्या द्रव्याचें नाशा-पासून रक्षण करावें. रक्षण केलेलें द्रव्य चांगल्या प्रकारें वाढवावें, आणि वाढलेल्या द्रव्याचा गरीबांच्या उपकारांत उपयोग करावा.

जांना धास्ती, अशा संकोचांत आणि पेचांत इंग्रजी शिक्षणाची वाढ या देशांत होत आली आहे.

इंग्रज मुत्सद्यांनीं असें ठरविलें कीं, शेक्सपीअर आणि मिल्टन, बायरन आणि टेनिसन, स्कॉट आणि थॅकरे, अथवा मिल्ल आणि स्पेन्सर हिंदुस्थानचे लोक शिकले म्हणून काय बिघडलें ! त्यांनीं इंग्रजी वाङ्मयाचा मनःपूत व्यासंग करावा आणि खुशाल राज्यकर्त्यांचें अभीष्ट चिंतीत सुखशांतीनें दुसरा कांहीं एक उद्योग अगर व्याप न करितां, नांदावें. "एका गालावर थप्पट बसली तर शांतपणें दुसरा गाल पुढें करावा," "आपल्याशीं लोकांनीं जसें वागावें असें वाटत असेल तसें आपण दुसऱ्याशीं वागावें, " "श्रीमंतांना स्वर्गद्वार मोकळें नाहीं," "सर्व माणसें ईश्वराचींच लेकरें आहेत, " इत्यादि ख्रिस्तनीतीचे धडे बायबलांतून हिंदू शिकले व त्याप्रमाणें आपल्याशीं वागले तर त्यांत काय वावगें आहे ? असा विचार इंग्रज मुत्सद्यांनीं केला, व त्यांनीं हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांस आपल्या वाङ्मयप्रेमांत गुंतविलें.

ही नुसती शाब्दिकच सहानुभूति त्यांनीं दाखविली असें नव्हे; तर वरील प्रकारच्या शिक्षणाचा लाभ ब्राह्मणांप्रमाणें, क्षत्रियांस, वैश्यांस, शूद्रांस व अतिशूद्रांसहि व स्त्रियांसहि मिळावा, अशासाठीं त्यांनीं ठिकठिकाणीं शाळा काढल्या व लोकांना उत्तेजन देऊन अनेक शाळा काढविल्या. इतकेंच नव्हे तर त्यांनीं आणखी अशीहि तरतूद केली कीं अगदीं टांचणीपासून तों तरवारीपर्यंत, जानव्याच्या सुताच्या धाग्यापासून तों धोतरापर्यंत, कोरड्या दारूपासून तों पेयदारूपर्यंत, सारे उपयोगी आणि निरुपयोगी पदार्थ हिंदू प्रजेनें तयार करीत बसण्याची दगदग वांचवली. तुम्हांला चैनीचे पदार्थ हवे असूं द्या किंवा तुमच्या दुखाणाइतांना औषधींची गरज वाटेल तितकी खुशाल लागूं द्या, ते सर्व पदार्थ व त्या सर्व गुणकारी औषधि सातासमुद्रांपलीकडून आणून

घरपोंच करण्याची जबाबदारी त्यांनीं पत्करली. इतकें स्वास्थ्य लाभ-ल्यावर आमच्याकडील अर्धशिक्षित तरुणांना मिस्टरीज ऑफ धी कोर्ट ऑफ लंडन आणि पूर्ण शिक्षितांना मिल्ल, स्पेन्सर, शेक्सपीअर, मिल्टन वाचण्यापलीकडे दुसरा कोणता महत्त्वाचा उद्योग राहिला होता? रेनॉ-ल्डच्या निवडक कादंबऱ्या, बायरनच्या स्फुट कविता पुनः पुन्हां वाचणें हाच सामान्य इंग्रजी जाणणाऱ्या तरुणांचा काम-पुरुषार्थ, सरकारी नोकरी पटकावणें किंवा फार तर वकिली-डॉक्टरी करणें हाच अर्थ-पुरुषार्थ, सनातनी धर्मास व ब्राह्मणांस शिव्या देऊन एकेश्वरी, दयानंदी वगैरे पंथ काढणें हाच धर्म-पुरुषार्थ आणि फ्रान्स, इटली, अमेरिका, जपान या देशांतील स्वातंत्र्यांच्या लढ्यांचे गोडवे गाणें, फार तर त्यांची बारकाईनें चिकित्सा करणें व आवेशयुक्त भाषणें करणें हाच मोक्ष-पुरुषार्थ होता. आर्तांनीं डाक्टरांकडे जावें, अर्थार्थींनीं विला-यती मालाची दलाली करावी, जिज्ञासूंनीं बेकन, स्पेन्सर वाचावे आणि राजनैतिक मुमुक्षूंनीं सरकारी पाहुणचारांत राहावें, अशीहि त्या शांत-तेच्या काळाची समाजाची घडी बसली होती. आपल्या चवदा विद्या आणि चवसष्ट कला, आपलीं षड्शास्त्रें, आपले वेद, उपवेद आणि वेदांगें यांच्या शिक्षणाची तर कांहींच गरज न राहिल्यामुळें पूर्वीच्या साऱ्या पाठशाळांना रजा देण्यांत आली होती. आसरा तुटल्यामुळें त्याहि नामशेष झाल्या. कोष्ट्याचा मुलगा इंग्रजी शाळेंत गेल्यावर मग घरांत चरका आणि मागाची अडगळ कोण ठेवतो? कासाराचीं मुलें बाबा पद्मजी बनलीं, मग त्या ओतकामाच्या भट्ट्या आणि घडकामाचा व्याप करतो कोण? ब्राह्म समाज, प्रार्थना समाज अशा प्रतिष्ठित समाजांतून बायबलें शिकवूं लागले; मग उपनिषदांतील धर्मतत्त्वें वाचण्याची खटपट कशाला? आतां आर्यांग्ल नव्या स्मृति व्हावयाच्या मग मन्वादि स्मृतींचे गळांठे जाळलेले काय वाईट! तात्पर्य, नवें राज्य आलें, त्या-

सरसें पूर्वींचे सारें गेलें. इतकें कीं आतां पूर्वींच्या विद्यांपैकीं कोणत्याहि एका विद्येंत पुरा अधीत असा कोणीच राहिला नाहीं; इतकेंच नव्हे तर आर्य संस्कृतींतील प्राचीन विद्यांची पुरी यादी देणारास आज नोबेल प्राईज मिळेल असें कोणीं जाहीर केलें, तर तें प्राईज मिळविणारा पठ्ठ्या साऱ्या हिंदुस्थानांत आधुनिक सुशिक्षितांत एक तरी निघेल कीं नाहीं, याची शंकाच आहे ! जर्मनींतच तें बक्षीस कोणीं मिळविल्यास न कळे !

तें बक्षीस न मिळो.पण झोंपेवरून आपल्याला कळून येतें कीं विस्मृति ही सुद्धां मोठी सुखावह असते. ही विस्मृति जर सदैव टिकून राहाती तर काय बहार होती ! पण या प्रवाहरूप संसारांत स्थिर असें कांहींच राहात नाहीं. त्याप्रमाणें गतवैभवाच्या विस्मृतीच्या आरामखुर्चीवर आमची जी छान बैठक जमली होती, ती जीवनार्थ कलहानें अलीकडे बिघडत चालली आहे. शिवाय चंद्राननेचें मुख तयार करीत असतां सूर्यकमलाधिष्ठित ब्रह्मदेवाचा जसा आसनसंकोचानें जाच झाला, त्याप्रमाणें आजचे पदवीधर निरनिराळ्या महत्त्वाकांक्षा उभारीत असतां भगवंतांच्या अधिष्ठानज्ञानाच्या संकोचानें त्यांची खोडा बेडी होत आहे, व ते आपल्या पदव्यांचा धिःकार करीत आहेत. लक्षावधि तरुण आंग्ल विद्यागिरीच्या चढावावर छाती फुटेपर्यंत धूम ठोकीत आहेत ! पण वर जातात तों पुढें योगक्षेमाचा मार्ग नाहीं व मागेंहि फिरकतां येत नाहीं, असें पाहून निराशेच्या कड्यावरून ते आपला कडेलोट करून घेण्याचे बेतांत आहेत ! या विद्येच्या योगानें असंख्य हिंदु जवान नामर्द व पौरुषहीन झाले आहेत ! पूर्वीं पंजाबच्या कॉलेजांतील जवानांनीं स्त्रियांप्रमाणें नाजूक व कृश दिसणें हेंच सभ्यपणाचें लक्षण मानलें ! बंगालच्या तरुणांनीं फुटक्या तिनसांजा खोलींत मंद प्रकाश करून देवाच्या नांवानें ओक्साबोक्सी रडावें ही भक्तभावना ध्येयरूप

मानली ! मद्रासच्या तरुणांनीं उपासमार झाली तर बहेत्तर, पण इंग्रजी-शिवाय बात नाहीं असें व्रत धरलें. महाराष्ट्रीय तरुण कोरड्या बुद्धि-वादाच्या फक्या मारूनच डोक्यानें चालण्याची कसरत खेळूं लागले ! भंगटांच्या खोलींत, नाहीं तर काळणाच्या दुकानांत जसा सहानुभूति, बंधुप्रेम, वक्तृत्व, मनाची उत्कटता इत्यादि गुणांचा खच पडतो, त्याप्रमाणें कॉलेजांतील हॉस्टेलें, विद्यार्थ्यांचीं वसतिगृहें, व सुशिक्षित तरुणांचीं संकेतस्थळें, या ठिकाणीं वरील उदार धर्माची अमर्याद बहार पाहण्यास सांपडे !

मी हें कांहीं तरी कलुषित दृष्टीनें निराधार असें लिहित नाहीं. टीपांनीं ग्रंथाची जागा अडवूं नये असें कोणी म्हणतात, म्हणून टीपा देत नाहीं इतकेंच. पण स्वामी विवेकानंद,लाला लजपतराय,प्रतापचंद्र मुजुमदार, प्रफुल्लचंद्र रे, बर्ट्रांण्ड रसेल अशा किती तरी विद्वन्मान्य ग्रंथकारांच्या साक्षी मी जें लिहितों आहे, त्याच्या पुष्टिकरणार्थ देतां येतील. " मुलगा पदवीधर•न झाला तर जन्मून फुकट अशी बंगाली विद्यार्थ्यांची व त्यांच्या पालकांची फार दिवस असलेली भल-तीच समजूत बंगालच्या आर्थिक नाशाला कारण झाली. " " वस्तुतः शिक्षितांची पदवी हें केवळ त्यांच्या अज्ञानावरील झांकण आहे. पदवीधराला फारच थोडें कळत असतें आणि परीक्षेला किमान पक्ष जरूर असेल त्याहून अधिक जाणण्याची त्याची जिज्ञासाहि नसते !" असें प्रफुल्लचंद्र रे म्हणतात. तें केवळ बंगालपुरतेंच खरें असावें, असें मानण्याचें कारण नाहीं.

त्यांच्या म्हणण्याप्रमाणें हल्लींच्या हिंदी विश्वविद्यालयाच्या अवि-चारी व अप्रयोजक शिक्षण पद्धतींत असे अनिवार दोष आहेत कीं, तें शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांचे ठिकाणीं ह्या जगाच्या लढ्यांत हिमतीनें व हिकमतीनें पुढें सरसावण्याचा बिलकूल वकूब

नसतो. याप्रमाणें गुण म्हणजे संख्येच्या दृष्टीनें पदवीधर जरी असंख्य असले, तरी गुण म्हणजे चातुर्य, धूर्तता, या दृष्टीनें तरुणांचा या शिक्षणांत निःसंशय अधःपात आहे. सामान्य पदवीधर हा युनिव्हर्सिटीचा बिल्ला घेतलेला एक पढतमूर्ख असतो. बाबू प्रफुल्लचंद्र या वृद्ध आचार्यांचा शिक्षण संस्थांशीं व तरुण पदवीधरांशीं दीर्घकालचा निकट संबंध आहे. ते म्हणतात कीं, "प्राचीन वाङ्मयांत निष्णात असलेले अनेक पदवीधर त्यांनीं पाहिले. त्यांच्या ठिकाणीं कल्पकता किंवा कार्याची धडाडी मुळींच दिसत नसे. जुन्या वाङ्मयांतील किडेच ते. प्रसंगीं साक्रेटीस केव्हां काय म्हणाला, तें ते बिनचूक म्हणून दाखवतील. परंतु प्राचीनांचा उपदेश आचारांत कसा आणावा किंवा आपण आपली एखादी नवीन योजना कशी पार पाडावी, याबद्दल त्यांचें अज्ञान व कमकुवतपणा लज्जास्पद आढळे. याचा दोष केवळ विद्यार्थ्यांकडेच देतां येत नाहीं. सबंध शिक्षणपद्धतीच अत्यंत कुचकामाची झाली आहे." थोडक्यांत सुशिक्षिताच्या अधःपाताची ते अशी मीमांसा करितात कीं, "अध्यापकालाच जो विषय पुरा समजला नाहीं तो तो शिकवूं पाहातो. ज्यांना तो विषय जाणण्याची मुळींच उत्कंठा नसते ते विद्यार्थी त्याचेजवळ तो शिकत असतात. व अखेर उच्च प्रतीचें शिक्षण पुरें झाल्याचा दाखलाहि मिळवितात! मग अशा ह्या विद्वन्मणींच्या आयुष्याचा बोजवारा झाला तर त्यांत नवल काय?"

हल्लींच्या शिक्षणाचा प्रपंचास व परमार्थास, विशेष उपयोग नाहीं, बी. ए., एम. ए. च्या पदव्या मिळविल्या असतां कोणतीही कला प्राप्त होत नाहीं, कोणताही धंदा करतां येत नाहीं, कोठं नोकरीहि मिळत नाहीं, स्वावलंबनानें पोट कसें भरावें तें कळत नाहीं, कष्टाचे धंदे हलके म्हणून करवत नाहींत, धर्मावर श्रद्धा राहात नाहीं,

अर्थात् परमार्थहि साधत नाहीं, असें हें आजचें इंग्रजी शिक्षण आहे. नर-जन्मांत येऊन, दोन तपें डोकेंफोड करून वडिलांची इस्टेट शिक्षणा-वारी घालवून, इंग्रजी शिक्षणानें असा हा एक विलक्षण विचारी प्राणी तयार होतो ! हें म्हणणें कटु असलें तरी सत्य आहे. हिंदुस्थानांतील परकी राजसत्तेमुळें शिक्षणाची परिस्थिति अधिकच निरुपयोगी आणि व्यर्थ कालहरण व द्रव्यहरण करणारी असली, तरी ही शिक्षण पद्धति ज्याची अपुरी नक्कल आहे, त्या मूळ शिक्षण पद्धतीचाहि जवळ जवळ असाच बोजवारा तिकडे पाश्चात्य देशांत होत आहे.

तेथील गिल्बर्ट ब्रॅण्डसन हे एक अनुभवीक वजनदार गृहस्थहि असें म्हणतात कीं, " विशेषेंकरून व्यापार आणि उद्योगधंद्यांत विश्वविद्यालयाची पदवी हें एक यशप्राप्तीला वैगुण्यच मानावें लागतें. " सर थॉमस लिप्टन यांचेंहि म्हणणें असेंच आहे कीं, " ज्याचा व्यवहारांत कांहीं उपयोग नाहीं, असें भाराभर शिक्षण विश्वविद्यालयांतून देण्यांत येतें. यामुळें तरुणांनीं ज्या वयांत पैसे कमवावयास लागावें तें त्याचें बहुमोल आयुष्य व्यर्थ फुकट जातें. " इंग्लंडचे आजचे मुख्य प्रधान रॅम्से मॅकडोनाल्ड म्हणतात कीं, " विश्वविद्यालयांतील आयुष्यक्रमानें बहुतांचें हितापेक्षां अनहितच जास्त होतें." जगांतील सर्वांत मोठी असें म्हणविणाऱ्या ईस्ट इंडिया कंपनीचे पहिले आधारस्तंभ होणारे तरुण टॉम स्मिथ व बॉब क्लाइव्ह हे विद्वान् पदवीधर नव्हते. आतांहि इंग्लंडच्या गेल्या चार मुख्य प्रधानांपैकीं तीन पदवीधर नाहींत आणि इंग्लंडच्या आजच्या प्रधान मंडळांतील दोन तृतीयांश लोकांना आपल्याकडील दृष्टीनें कोणी विद्वान शिष्ट असें म्हणणार नाहींत. [ " have not the qualifications for a Calcutta social club." P.C. RAY ] अमेरिकेंत तर प्याद्याचा फर्जी [ From log cabin to the White house ] अशी म्हणच पडली आहे.

खरें शिक्षण आजच्या शाळांतून मिळत नाहीं. आजचे एक कर्तृत्ववान् पुरुष मुसोलिनी असें म्हणतात कीं, "मी एकच मोठा ग्रंथ वाचला आहे आणि मी एकाच थोरल्या शिक्षकाजवळ शिकलों आहें. माझें पूर्वचरित्र हाच तो ग्रंथ आणि माझा रोजचा अनुभव हाच माझा गुरु होय." लॉर्ड हाल्डेन हे शिक्षण विषयांतील एक तज्ज्ञ म्हणतात कीं, "सार्वजनिक जीवनाचे विद्यालयांत मला पंचवीस वर्षें शिकतां आलें याबद्दल मी आपणास धन्यवाद देतों."

मनुष्याचें कर्तृत्व आणि शिक्षण यांचा आपण कार्यकारणभाव जोडतों तो आपला भ्रम आहे. श्रीशिवछत्रपति आणि पहिले बाजीराव, महादजी शिंदे आणि मल्हारराव होळकर, नाना आणि बापू हे आपल्या विद्वत्तेनें प्रसिद्ध नव्हते. नवयुगांतील ॲंड्र्यु कार्नेजी, हेनरी फोर्ड, थॉमस एडिसन, लॉर्ड केबळ, थॉमस लिप्टन, रॅम्से मॅकडोनाल्ड असे बहुतेक सर्व व्यापारी, कारखानदार, इंजिनिअर्स, कलावंत व मुत्सद्दी पदवीधर नव्हते. आणि त्याचप्रमाणें आपल्या इलाख्यांत गेल्या शतकांतील भाटिये, मारवाडी, पारशी, बोहरी, मुसलमान, यांच्यांतील कोट्याधीश, व्यापारी पदवीधर कोणीहि आढळणार नाहींत. इतकेंच काय पण इंग्लंडांतील व हिंदुस्थानांतील प्रासादिक ग्रंथकारांचेंहि शिक्षण अगदींच बेताचें असलेलें आढळेल. छांदोग्य उपनिषदांतील अरुणिश्वेतकेतु आणि नारद-सनत्कुमार यांचे संवादांत शास्त्राध्ययनाची व्यर्थताच सिद्ध होते. तात्पर्य, परमार्थांत शास्त्रवासना हा एक प्रत्यवायच आहे. त्याचप्रमाणें प्रपंचांत अव्यवहारिक भाराभर शिक्षण व्यर्थच आहे. कांहीं काल विद्या हें एक भूषण म्हणून मानलें जात असे. पण तेंहि महत्त्व आतां पुस्तकी विद्वत्तेला कोणी देत नाहीं! 'विद्वान् सर्वत्र पूज्यते' असा आज अनुभव नाहीं. आज आपल्या देशांतील राजशाही, नोकरशाही, किंवा लोकशाही, कोणीच देशांतील विद्वानांच्या चरितार्थाची जबाबदारी

पत्करण्यास तयार नाहीं. धंदेवाईक विद्वान् म्हणजे वकील, डॉक्टर, शिक्षक, आणि एंजिनिअर, हे होत. पण सावकार पक्षकारांपेक्षां वकील जास्त, सधन रोग्यांपेक्षां डॉक्टर जास्त, अशा गरजेहून जास्त प्रमाणांतील पुरवठ्यामुळेंहि विद्वत्तेची माती झाली आहे ! व्यापार व हस्तकौशल्याचे धंदे यांत जी कमाई आहे ती विद्वत्ता प्राप्त करून देत नाहीं. असा आजचा सार्वत्रिक अनुभव आहे. मायेचीं अविद्या आणि विद्या अशीं दोन रूपें आहेत. त्यापैकीं येथील चालू इंग्रजी शिक्षण ही परमार्थतः धादांत अविद्या होय !

केवळ व्यावहारिक दृष्टीनें विचार केला तरी निदानपक्षीं एवढें तरी म्हणावें लागेल कीं श्रीमंतांचे मुलांनीं आपलीं मनें सुसंस्कृत करण्याकरितां आणि श्रीमंतीचे व्यर्थ आणि घातक विलास भोगण्यापेक्षां विद्यानंदाचा लाभ घेण्यासाठीं बी. ए., एम. ए., पीएच. डी. वगैरे पदव्यांचा हव्यास धरावा. पण गरीबांच्या मुलांनीं या पदव्यांच्या नादीं लागण्यापेक्षां ज्यास्त व्यवहारोपयोगी, ज्यास्त स्वावलंबनाचें असें शिक्षण संपादावें. "एक धड ना भाराभर त्या चिंध्या काशाला ?" यांप्रमाणें आजचें हें बहुगुणी शिक्षण व्यवहारांत व्यर्थ ठरतें. मग ज्यांना विद्येकरितांच विद्या शिकावयाची असेल, अध्ययन आणि अध्यापन यांतच आयुष्य वेंचावयाचें असेल, शास्त्रसंशोधन करावयाचें असेल, त्यांची गोष्ट वेगळी.

विद्येची महति प्राचीन कालापासून वर्णिली आहे. यामुळें विद्येची निंदा करणारास कित्येक वेड्यांतच काढतील. पण पुष्कळ शिकून किंकर्तव्यमूढ झालेल्या वेड्यापेक्षां हा वेडा ज्यास्त शाहाणा नव्हे काय ? तात्पर्य, शिक्षणांतील गुण आज कोणाला सांगायला नको आहेत, ते ऐकून ऐकून सर्वांना माहीत झाले आहेत. विद्येची प्रशंसा यावर कोणी विद्यार्थीहि चांगला निबंध लिहील. आजच्या विद्येंत जे दोष आहेत, जें कालहरण आहे, जो बुद्धिभ्रंश आहे, जी निष्फलता आहे, याचाच

विचार होणें अगत्याचें आहे. स्वयंफलरूप एक अध्यात्मविद्या होय. आज जी शाळेंत शिकविली जाते ती विद्या स्वयंफलरूप नाहीं. तसेंच ती असावी तशी साधनरूपहि नाहीं. ब्राह्मणांचा सश्रद्ध वेदाभ्यास, क्षत्रियांचें युद्धकर्म, वैश्यांचा उद्दीम, व्यापार, पशुपालन, आणि शूद्रांची सेवा, कला व कष्टाचे धंदे यांपैकीं आजच्या शिक्षणानें कोणत्या गोष्टी प्राप्त होतात, याचा कोणी विचार करतो काय ? हल्लीं ज्याला आपण श्रेष्ठ प्रतीचें शिक्षण असें म्हणतों, त्या शिक्षणानें मनुष्य तुटक, ऐदी, घमेंडखोर, व व्यवहाराला बहुधा नालायक बनतो. यास अपवादहि आढळतील. पण ते अपवाद या विकृत विद्येची थोरवी सिद्ध न करितां व्यक्तित्वाचा महिमा सिद्ध करतील. सुशिक्षितांत जशीं सुस्वभावी व कर्तृत्ववान माणसें आढळतील तशीं तीं अविद्वानांतहि आढळतील. व्यक्तित्व हें झांकत नाहीं. तें विद्येस शोभा आणतें, त्याप्रमाणें विद्येची परवा न करितांहि पुढें झळकतें.

एखादें विशिष्ट शास्त्र, कला, धंदा, उद्योग ह्यांचें शिक्षण जरूर व उपयोगाचें असतें हें खरें; आणि हेंहि खरें कीं हल्लीं प्रत्येक व्यवसायाचें, शारीरिक व मानसिक क्रियांचें एकेक शास्त्र बनलें आहे. पण तें शास्त्रीय शिक्षण एकीकडे व ते व्यवसाय दुसरीकडे असा आज प्रकार आहे. नुसत्या 'बी कॉम्'च्या डोक्यांत अनेक उपपत्ति असतील. पण व्यापार धंद्यांत ते वाकबगार नसतात, असें तज्ज्ञच म्हणतात. वास्तविक व्यवसाय प्रत्यक्ष करीत असतां त्यांत प्राप्त होणारें जें अनुभविक ज्ञान तेंच शास्त्रीय शिक्षण होय. पण आजचें शिक्षण प्राय:अनुभवशून्य आहे. ज्याच्या नशिबीं फार तर महिन्याचे शेंपन्नास रुपयांची उलाढाल करण्याचें येणार, त्यांनीं एकॉनॉमिक्सचा अभ्यास करून काय करायचें ! सौभाग्यावांचून शृंगाराची शोभा काय ? शेंकडा किती विद्वान् फिजिक्स व केमिस्ट्री, बॉटनी व झुऑलजी, अशा

शास्त्रीय शिक्षणाचा व्यावहारिक उपयोग करूं शकतात. किंवा शास्त्रीय संशोधन करितात? संस्कृत आणि तत्त्वज्ञान यांतील पदवीधरां-पैकीं शेंकडा किती पदवीधर कट्टे धर्मिष्ठ निपजतात किंवा आत्मानुभवी संत बनतात? प्रेमानें व लोभानें जे शेजाऱ्याचाहि उंबरठा ओलांडीत नाहींत, त्यां तुटक तिरसिंगरावांचें भौगोलिक ज्ञान काय करावयाचें? जे वडिलांची परंपरा पाळीत नाहींत त्या इतिहासज्ञांचें काय कौतुक करावें? ज्यांना पायाखालचें कळत नाहीं, त्यांची व्यापक दृष्टि काय कामाची? ज्यांनीं धार्मिक भावना जीवें मारली त्या तार्किकांच्या स्वतंत्र बुद्धीला शतशः नमस्कार असोत! घरच्या म्हातारीचें मात्र काळ होणारें आणि अनीतीचा माथा उजळ करणारें नवीन समाजशास्त्र काय कामाचें! ज्यांना अंतर्मुखतेची भाषा कळत नाहीं, त्यांचें भाषाज्ञान तुच्छ होय! ज्यांनीं थोडक्यांत हजारों लोकांचा संहार करण्याच्या युक्त्या शोधून काढल्या त्या रसायन शास्त्रज्ञांच्या ज्ञानाचा धिःकार असो! ज्या यांत्रिकांनीं लाखों गरीबांच्या संसाराची राखरांगोळी केली, त्यांच्या अप्रयोजकपणाबद्दल मुकी प्रजा अश्रु ढाळीत आहे!

तात्पर्य, आज शिकविल्या जाणाऱ्या श्रेष्ठ नामक विद्येची निंदा करणारा अविचारी कीं तशा विद्येची अवास्तव स्तुति करणारा अवि-चारी? असा माझा सवाल आहे. मी केवळ विद्येची निंदा करीत नाहीं. तर ती आज ज्या पद्धतीनें दिली जाते, त्या पद्धतीचा धिःकार करीत आहे. अगोदर शाब्दिक विद्येची पोपटपंची आज घोटावी, उद्यां अकालींच उपासमारीनें मरून जावें आणि मग शिकलेल्या विद्येचा अनुभव घेण्यास पुढला जन्म कोठें तरी योग्य स्थळीं पहावा, अशी ही हिंदुस्थानच्या नवयुगांतील विद्यादेवीची त्रिस्थळीं यात्रा आहे! या यात्रेंत 'नेम फार करूं नये आणि नेमावांचून राहूं नये' हा समर्थांचा

दंडक पाळावा. शिकल्यावांचून राहूं नये आणि कामापेक्षां जास्त शिकूं नये, हेंच सामान्य जनांस योग्य होय.

पण आजच्या जीवनार्थ चढाओढींत अधिकाधिक न शिकावें तर पुढें काय करावें? असा विद्वान् वाचक मला रागारागानें प्रश्न विचारतील. त्यास माझें उलट म्हणणें असें आहे कीं, एम. ए., पीएच. डी. होऊन तरी पुढें काय करावें? हा प्रश्न कोठें संपतो आहे? उत्तरोत्तर बिकट होत चाललेल्या ह्या संसारांत 'मग पुढें काय करावें ?' हा प्रश्न विवाहितापेक्षां अविवाहिताला सोडविणें जसें तारतम्यानें सोपें असतें, कारण त्याला बारा वाटा मोकळ्या असतात; त्याप्रमाणें सुंदर पद्वीशीं लग्न लावणारापेक्षां सामान्य मनुष्यास हा प्रश्न सोडविण्यास जास्त स्वातंत्र्य मिळतें. कारण तो वाटेल ते उद्योग करूं शकतो. आणि उलट एम. ए., पीएच. डी.पैसे मिळविण्याच्या निरनिराळ्या धंद्यांत पारंगत होतों असें नसून बऱ्याच धंद्यांत त्याला शिरतां येत नाहीं, इतका तो अहंतेनें ऐदी व स्थूल मात्र झालेला असतो. " पुढें काय करावें ? " या प्रश्नाची निकडच त्याचें उत्तर सुचवील. ठोठावलें कीं दार उघडतें. गरजच युक्ति प्रसवते. ईश्वराला अनन्य गतिक झालें असतां योगक्षेमाची काळजी तो घेतो. अशीं पुढें काय करावें? या प्रश्नाचीं उत्तरें आहेत. " फुटति तरुवर ऊष्ण काल मासीं। जीवन तयासी कोण घाली ? " ईश्वराच्या ह्या जगड्व्याल सरकशींत सर्वांचा खुराक तयार आहे.प्रत्येकाच्या पूर्वसुकृतानुसार त्याची योगक्षेमाची काळजी घेणारा ईश्वर आहे. मनुष्य काय तरतूद करूं शकेल? विद्यावारुणि ही एक निशा आहे. ज्याला उद्योग करून पोट भरावयाचें आहे, त्यानें या निशेच्या नादीं न लागावें तें बरें. निशेंत आनंद आहे तसा या अविद्येंतहि आहे, पण त्यानें माध्यान्हकालीं आपलें पोट भरत नाहीं. व आपल्या घरच्या मुलांमाणसांचीहि तरतूद लागत नाहीं.

विश्वविद्यालयांत अनेक भाषा शिकवितात. पण लक्ष्मीची भाषा म्हणजे उद्योगधंद्याची भाषा, तेथें शिकविली जात नाहीं. तेथें अनेक शास्त्रें शिकवितात, पण फक्त पोट भरण्याचें शास्त्र मात्र शिकविण्यास विसरतात, अथवा शिकवूं शकत नाहींत. तेथें मनें सुसंस्कृत होतात, असें समजतात. पण तीं समर्थ, निःशंक व खरीं समाधानी झाल्याचें आढळत नाहीं. हनुमंतासारखें बल आणि गरुडासारखी दृष्टि हीं ध्येयसिद्धीचीं दोन साधनें आहेत. तीं दोन्ही आजच्या पुस्तकी शिक्षणांत साधत नाहींत. पाश्चात्य विश्वविद्यालयांत उच्च शिक्षण घेऊन परत आल्यावर किंकर्तव्यमूढ होऊन पुढें आपल्या मुलांस तशा प्रकारचें उच्च शिक्षण न देण्याचा निश्चय करणारे आज विद्वानांतहि कित्येक आढळतील. यास्तव पुस्तकी विद्येचा अति हव्यास सोडून अनुभवानें शहाणे व समर्थ व्हावें, इतकेंच मला या चरित्राद्वारा दाखवावयाचें आहे.

हें माझें प्रकरण लिहून झालें असतां माझे एक मित्र ह्या विचारसरणीचा असा निष्कर्ष काढतातः—"आजच्या विशिष्ट प्रकारच्या शिक्षणास अवास्तव महत्त्व देऊं नये. शिक्षण नसतांहि मनुष्य वर येऊं शकतो. अशीं उदाहरणें पाहून आधुनिकांच्या दृष्टीनें अशिक्षित ठरणाऱ्या मनुष्यानें गतधैर्य न होतां स्वपराक्रमानें पुढें येण्याची महत्त्वाकांक्षा अवश्य बाळगावी. ज्यास शिक्षणाचा लाभ घडला असेल किंवा घडण्यासारखा असेल त्यांनीं तो अवश्य घ्यावा. त्यांत हितच होऊं शकेल. पण एवढी मात्र सावधगिरी त्यांनीं बाळगावी कीं, त्या शिक्षणांत उत्पन्न होणारे आनुषंगिक दोष आपल्यांत उत्पन्न होणार नाहींत. ही गोष्ट साधण्यास या प्रकरणांतील विचारांच्या मननानें विचारजागृति होईल."

नवयुगांतील निरर्थक शिक्षणक्रमाच्या पित्ताधिक्यानें ज्याप्रमाणें देश बेजार होत आहेत; त्याचप्रमाणें बेसुमार वाढलेल्या भांडवलशाहीनें

देश बेकार होत आहेत! जेथें उद्योगधंद्यांची पूर्ण भरभराट आहे, अशा देशांचा आपल्याला सहजच हेवा वाटतो. पण अशा उद्यमशील देशांत आज अशी चमत्कारिक स्थिति प्राप्त झाली आहे कीं, अर्धे लोक यंत्राचे साह्यानें मजुरी कशी कमी करावी या विचारांत गढले आहेत, आणि बाकीचे निम्मे बेकार लोकांच्या पोटापाण्याचा प्रश्न सोडविण्यांत गुंतले आहेत! यांत्रिकशाहीनें लाखों गरिबांची उपासमार केली आहे आणि अशा रीतीनें अर्धें अधिक जग अन्नवस्त्राला महाग झालें असतां भांडवलशाहीच्या पोटफुगीवर उतारा म्हणून गहूं, साखर, मका, कॉफी, कापूस यांचे पर्वतप्राय ढीग समुद्रांत लोटून दिले जात आहेत! किंवा बाजारभावाची तेजी राखण्याकरितां पेटवले जात आहेत!!!

विद्या आणि वित्त यांच्या समृद्धीचें वर काढलेलें चित्र विकारवशतेनें भडक रंगांत रंगविलेलें नसून पोक्त व अनुभवी अशा तज्ज्ञांच्या अनुभवाचें सार वर ग्रथित केलें आहे. तें इतकें सविस्तर येथें देण्याचें कारण माझे चरित्रनायक विष्णु तात्या यांचे जवळ विद्वत्ता आणि संपदा या दोहोंची समृद्धि नव्हती. आणि म्हणून त्यांच्या महत्त्वाकांक्षा अशक्य कोटींत गणल्या जात होत्या. पण त्यांचा अनुभवच ज्ञानरूप झाला, आणि शिवार्पण बुद्धीनें त्यांस संपदाहि सुफलदायी झाली. ह्याप्रमाणें त्यांच्या महत्त्वाकांक्षांना वरील साधनांच्या अभावीं कितपत यश येऊं शकलें, हाच ह्या चरित्रांतील अनेक विचारांच्या धाग्यांपैकीं एक विचारतंतु आहे. तिकडे वाचकांनीं सावधानतेनें चित्त द्यावें.

इतक्याहि उप्पर हे माझे कळकळीचे विचार विद्वानांच्या, श्रीमंतांच्या व सामान्य वाचकांच्या तिरस्कारासच पात्र झाले, तर त्याचाहि मला खेद वाटणार नाहीं. कारण सत्य हें सर्वांस प्रिय वाटतेंच असें नाहीं, असा प्राचीन काळापासूनचा अनुभव आहे. श्रीगोपालकृष्णाचा

हृदयस्पर्शी साधा वेणुनाद याज्ञिक पंडितांस रुचला नाहीं. कंसशिशुपालादि उन्मत्तांचा अहंकारहि त्यानें जिराला नाहीं. त्याचप्रमाणें गोरूप इंद्रियांना विषयांच्या खुराकानें मस्त करणाऱ्या व देहबुद्धीच्या घड्यांच्या उतरंडींचा भार शिरीं वाहणाऱ्या अजाण गोपगोपींस, गोरूप इंद्रियें मोरमुगुटधारी गोविंदास आत्मवश कशीं करून घेतां येतात, तें रहस्य कांहीं काळ समजलें नाहीं. मनाच्या निःसंगतेचें नवनीत श्रीगोपाळकृष्णास फार आवडतें. तें त्यास कोणी न दिल्यास तें तो चोरूनहि घेतों.

**अभिज्ञांस तों ग्रासिलें मत्सरानें ।**
**धनाढ्या प्रभू व्यापिलें दुर्मदानें ।**
**शिरीं थोर मूर्खांस अज्ञान ओझें ।**
**जिरालें निजांगींच पांडित्य माझें ! ॥ २ ॥**

भर्तृहरी समश्लोकी.





# प्रकरण १० वें

## सल्लागार स्नेही.

अपि संपूर्णतायुक्तैः कर्तव्याः सुहृदो बुधैः ।
नदीशः परिपूर्णोऽपि चन्द्रोदयमपेक्षते ॥ ६८३ ॥

[ बुद्धिमान् मनुष्यांनीं स्वतः संपूर्ण असतांहि मित्र करावे. कारण समुद्र परिपूर्ण आहे, तथापि चंद्राच्या उदयाची वाट पहात असतो. ]

विष्णुतात्यांचे सहाध्यायांनीं अतिपरिचयानें त्यांची योग्यता कदाचित् जाणली नसेल,पण विशेष अनुकूल परिस्थिति नसतां वाढीस लागलेल्या त्यांच्या महत्त्वाकांक्षेच्या वेलाला अचानक दोन आधार मिळाले. त्यांच्या शिवोपासनेंतील हे दोन आधार म्हणजे असेच प्रतिकूल परिस्थितींतून वर डोकें काढूं पाहणारे दोन सच्छील व उद्योगी मित्र होत. हे दोघे मित्र म्हणजे मुंबईचे सुप्रसिद्ध जनार्दन महादेव गुर्जर.व दत्तात्रय कृष्ण सांडू हे होत. योगायोगाची गोष्ट अशी कीं पुराणिक, गुर्जर आणि सांडू हे मूळचे राजापूर तालुक्यांतीलच. फरक इतकाच कीं, पनवेलच्या पुराणिकांस राजापूर तालुक्यांतील पेंडखळें सोडल्यास तीन चार पिढ्या लोटल्या होत्या आणि जनार्दन महादेव गुर्जर व दत्तात्रय कृष्ण सांडू यांनींच खुद्द राजापूर तालुक्यांतील मूळगांव तिवरें सोडून चरितार्थाकरितां मुंबई पतकरली होती.

प्रथम जनार्दन महादेव गुर्जर हे मुंबईस आले. कोंड तिवऱ्याच्या महादेव भट गुर्जर पाध्यांचे हे वडील चिरंजीव. महादेव भटजींनीं जनार्दनाला मोडी बालबोध अक्षर गुणाकार आणि भागाकार येथपर्यंत शाळेंतील शिक्षण दिल्यावर मग शिक्षण पुरें करून ब्रह्मकर्म शिकविलें. महादेव भटजींचे घरचें अठरा विश्वे दारिद्य व मुलाबाळांचा पोरवडा मोठा. खेडेगांवांत भिक्षुकी ती काय चालणार ? शिवाय त्या कालींहि धर्मश्रद्धेला ओहोट लागलीच होती. अशा बिकट परिस्थितींत घरांत गुपचूप उडदामुगाच्या उकडलेल्या पाल्यावरच क्षुधाशांती करून, 'मी जेऊन आलों ' म्हणून ढेंकर देत जनूला इतर सुखी मुलांत मिसळावें लागे! पण असें तरी किती दिवस चालणार! घरांत निभाव लागत नाहीं असें पाहून जनार्दनाला आपल्या बाराव्या वर्षीच कोणी तरी सोबत पाहून पोटासाठीं मुंबई पहावी लागली ! ते मुंबईस आले, तेव्हां त्यांच्याजवळ अवघे दोन आण्यांचे पैसे होते. त्यांच्या शिक्षणाची कमालमर्यादा वर दिलीच आहे. पण त्यांच्या भाग्योदयाला तेवढेंच शिक्षण पुरेसें झालें. त्यांचें बालबोध अक्षर फारच उत्तम असल्यामुळें त्यांना शिळाप्रेसमध्यें लेखकाचें काम मिळूं लागलें. तेंच कामें वाढतां वाढतां मुंबईच्या जगदीश्वर शिला छापखान्यांतील पदबोधिनी गीता हा त्यांचा समग्र हस्तलिखित ग्रंथ शके १७९६ मध्यें प्रसिद्ध झाला. हेंच त्यांच्या हस्तलिखित ग्रंथांपैकीं शेवटलें पुस्तक होय. यापूर्वीच त्यांनीं तृण जळुकेप्रमाणें केवळ लेखकाचे रुक्ष कामांतून आपलें मन काढून ते थोडथोडीं पुस्तकें विकूं लागले. त्यांनीं थोडा संस्कृताचाहि घरीं अभ्यास केला. व ते एक मर्मज्ञ बुकसेलर बनले. पण अशा रीतीनें ते स्वतंत्र धंदा करूं लागले तरी ते व त्यांचे बंधु हातानेंच स्वयंपाक करून जेवीत असत. कधीं खाणावळींत गेले नाहींत. पूर्व: कालच्या कोंकणच्या होतकरू तरुणांची राहण्याची टापटीप, काटकसर, शुचिर्भूतपणा, अल्पसंतोष वे

बाणेदारपणा इत्यादि गुण फारच वाखाणण्यासारखे असत. दिडकी दिडकी जोडून आणि पैपैसा राखून ते धीराधीरानें सुखवस्तु होत. ही हिकमत आजच्या पदवीधर तरुणांत मुळींच राहिली नाहीं. अशा स्वावलंबी पुरुषाचे स्नेहीहि स्वावलंबीच असतात. एका छापखान्यांत दोन रुपये पगारावर टाईप घांसण्याचे कामावर असणारा एक गरीब मुलगा जावजी दादाजी साऱ्या हिंदुस्थानांतील एक आदर्शभूत असा छापखानदार स्वपराक्रमानें बनला. त्यांची व जनार्दन महादेव गुर्जर यांची ग्रंथी जमली. तेव्हां मग दुसऱ्यांचीं पुस्तकेंच विकून चरितार्थ न चालवितां गुर्जर स्वतां आपले हिमतीवर जावजी दादाजीच्या निर्णय-सागर छापखान्यांत लहान मोठीं पुस्तकें छापून प्रसिद्ध करूं लागले. अशीं त्यांनीं स्वतांचीं पुष्कळ पुस्तकें छापलीं. केरळकोकिळ मासिक, त्या मासिकाचे संपादक महाराष्ट्र-भाषा-चित्र-मयूर कृष्णाजी नारायण आठल्ये यांची सार्थ ज्ञानेश्वरी, धनुर्धारीचीं पुस्तकें, इत्यादि अनेक ग्रंथ त्यांनीं आपल्या जबाबदारीवर छापून प्रसिद्ध केले. व मुंबईत मार्मिक ग्रंथ-प्रकाशक म्हणून नांव मिळविलें. याच्या पुढची पायरी म्हणजे स्वतांचाच छापखाना काढणें ही होती. त्यासाठीं त्यांनीं पनवेल शहराजवळ नदीकांठीं पारपुंड गांवीं सुंदर जागा विकत घेतली. व तेथें शेतवाडी करून व घर बांधून ते राहूं लागले. तेथें छापखान्याकरितांहि त्यांनीं इमारत बांधली. अशा रीतीनें ते पनवेलीजवळ येऊन राहूं लागल्यामुळें पनवेलचे उद्यमशील विष्णु-तात्या पुराणिक यांची त्यांची सहजच ओळख झाली व थोड्याच अवधींत ते एकमेकांचे परमस्नेही बनले. आपले मनोराज्याचे विचार जे उपहास बुद्धीनें तुच्छ न लेखतां, सहानुभूतीनें व प्रेमादरानें ऐकतील व त्यांत तन्मय होऊन सल्लामसलतहि देतील, असे उद्योगांतील हे एक मर्मज्ञ स्नेही तात्यांस लाभले, त्यामुळें त्यांस परमानंद झाला. व

त्यांच्या विचारविनिमयाच्या वरचेवर बैठकी होऊं लागल्या. गुर्जरांनाहि पनवेलच्या या उदयोन्मुख घराण्याचा मोठाच आसरा मिळाला.

तात्यांचे दुसरे स्नेही दत्तोपंत सांडू हेहि विशेष शिकलेले नव्हते. फार तर मराठी सहाव्या इयत्तेपर्यंत त्यांचा अभ्यास झाला असेल. पण त्यांना लहानपणापासून कविता करण्याचा नाद असे. शिंदे, होळकर अशा बड्या संस्थानिकांकडे ते कविता रचून पाठवीत. चाळीस पन्नास वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत मोरोपंत वाचण्याचा नाद अनेकांना असे. दत्तोपंतहि वामन, मोरोपंत ह्या कवींचे भोक्ते होते. ते जसे वाङ्मयप्रेमी, तसे कलावंतहि होते. कागदाची जाळी कातरणें, त्याचीं मखरें करणें, हे पेशवाईतल्या गणेशोत्सवाचे अवशेष दिसतात. दत्तोपंत त्यांतहि निष्णात होते. शिवाय दत्तोपंतांचे वडिलांनीं आर्यवैद्यकीचा थोडासा अभ्यास केला असून त्यांना औषधें तयार करण्याचा नाद असे. त्यामुळें दत्तोपंतांनाहि तो नाद थोडासा लागला. पण असल्या किरकोळ नादानें चरितार्थ कसा भागावा ? तेव्हां ते आपल्या वयाच्या विसावे वर्षीं त्यांचे ग्रामस्थ गुर्जर यांच्या आधारावर मुंबईस आले. त्यांनीं थोडा इंग्रजी अभ्यास केला होता. ते मुंबईस आल्यावर गुर्जरांच्या खटपटीनें त्यांना हायकोर्टांत ट्रॅन्स्लेटरचे ऑफिसांत नोकरी मिळाली. ते स्वतः मोठे तैलबुद्धीचे होते. त्यामुळें त्यांची छाप त्यांच्या ऑफिसांत चांगली बसली. ते बारा वर्षें सहकुटुंब गुर्जरांचे येथेंच राहात होते. अशीं दोन कुटुंबें इतका दीर्घकाल बिनतक्रार एके ठिकाणीं नांदणें, ही गोष्ट थोडी अजबच खरी. कारण एकाच कुटुंबांत पूर्वीची एकत्र अविभक्त कुटुंबपद्धतिहि नांदत नाहींशी झाली होती.परंतु गुर्जरांनीं दत्तोपंतांना सख्या धाकट्या बंधूपेक्षांहि अधिक मानलें. पुढें लवकरच गुर्जरांनीं मुंबईत रामवाडीचे नाक्यावर आपल्या दुकानासमोरच सांडूनां कमिशन एजन्सीचें दुकान काढून दिलें.तें दुकान

दत्तोपंतांचे बंधु वासुदेवराव हे चालवीत. त्यासच पुढें स्टेशनरी सामानाची जोड करून देऊन गुर्जरांनींच आपले नूतन परिचित पनवेलचे पुराणिक यांच्या औषधांची एजन्सीहि सांडूंना मिळवून दिली. तो एक किफायतशीरच धंदा सांडूंना लाभला व सांडूंसारखे विशेष खटपटी एजंट पुराणिकांना लाभले. यामुळें लवकरच गुर्जर, पुराणिक व सांडू हें त्रिकूट जमलें. व कांहीं काळ त्यांच्या सल्लामसलतीचा फायदा विष्णु कृष्ण पुराणिक यांस मिळाला. आणि उदयोन्मुख अशा पुराणिकांचा आधारहि दोघांस लाभला. पुढें पुराणिकांच्या महत्त्वाकांक्षेचा वेल जसा जोरानें भरारूं लागला, तसा त्यांचा उद्योग महाराष्ट्रांत लोकांचे जास्त नजरेंत भरूं लागला. त्या काळीं महाराष्ट्रांत जनार्दन महादेव गुर्जरांचें दुकान, सांडूंची एजन्सी, आणि पनवेलचा पुराणिकांचा कारखाना, हे उद्योग सुप्रसिद्ध होते. पुण्याचे भास्कर नारायण [ नारोअप्पाजी ] गोडबोले हे या तिघांत एक चवथे स्नेही होते. पण त्यांची मला विशेष माहिती नाहीं. वरील तिन्ही उद्योगी पुरुषांत ज्या गुणांत विलक्षण साम्य होतें, ते गुण अवश्य लक्षांत घेण्यासारखे आहेत. तिघांचीहि मूळची फार गरिबी, तिघांचेंहि शिक्षण अगदीं बेताचें, तिघांचेंहि घरचें वळण शुद्ध धार्मिक, तिघेहि सांप्रदायी गुरुपुत्र, तिघेहि महत्त्वाकांक्षी व अत्यंत निरालसी, तिघांचेंहि वागणें अत्यंत हिशेबी, राहाणी अत्यंत साधी व काटकसरीची, तिघेहि एकमेकांकरितां झटणारे, प्रेमळ व विनयशील असे होते. हे गुण कोणास सामान्य प्रतीचे वाटतील. पण आजच्या कॉलेजांतील एकांगी पुस्तकी ज्ञानापेक्षां हे गुण अनेक पटीनें श्रेष्ठ होत. अंगीं विद्वत्ता नसतां या गुणांनींच त्यांना ऊर्जितावस्थेस आणलें, उलट या गुणांच्या अभावीं केवळ पुस्तकी विद्वत्ता हें लांछन होय !

**मित्रवान्साधयत्यर्थान्दुःसाध्यानपि वै यतः ।**
**तस्मान्मित्राणि कुर्वीत समातान्येव चात्मनः ॥**

[ मित्रयुक्त मनुष्य असाध्य कार्येहि सिद्ध करूं शकतो, करितां स्वभावादि गुणांनीं आपल्या बरोबरीचे मित्र करावे. ]

---



# प्रकरण ११ वें.

## आर्यौषधींचा कारखाना.

व्यवसायं समाश्रित्य सहायान्योऽधिगच्छति ।
न तस्य कश्चिदारम्भः कदाचिदवसीदति ॥

महाभारत १२।२९८।४२

[जो आपली मुख्य भिस्त स्वतःचे प्रयत्नावर ठेवून मग दुसऱ्यांचें सहाय घेतो, त्याचा कसलाहि प्रयत्न केव्हांहि फसत नाहीं.]

कृष्णशास्त्री पुराणिक हे सखारामशास्त्री नावलेकर यांच्या साह्यानें वैद्यकी करूं लागले. त्यांची वैद्यकी केवळ स्थानिकच न राहतां कृष्णशास्त्री यांनीं त्यास व्यापाराचें रूप दिलें. यांतच कृष्णशास्त्री यांचें व्यवहारचातुर्य व धूर्तता दिसून येते. वर्तमानपत्रांत औषधांच्या जाहिराती देऊन आपला धंदा चालविणारे मागून पुष्कळ झाले. पण याचा उपक्रम कृष्णशास्त्री यांनीं केला. कृष्णशास्त्री यांचेजवळ आरंभीं भांडवल कांहींच नव्हतें. त्यावेळीं पदरचे शेंदोनशें रुपये सुद्धां भांडवल त्यांचेजवळ नव्हतें. एक देवदारी खोक्याचें कपाट आणि त्यांत दहावीस प्रकारचीं औषधें इतकाच आरंभ. पुढें कांहीं विष्णु तात्याचे अंगावरील सोनें, कांहीं विठोबाशेट यांनीं दिलेली देणगी, कांहीं स्वतांची पुराण सांगण्याची कमाई, अशी कशी तरी जोड करून त्यांनीं हा

व्यवसाय चालविण्याचें ठरविलें. आणि सखारामशास्त्री यांचे व आपले हिशेब पैनपै चोख ठेवून त्यांना सुमारें चाळीस वर्षे संभाळलें. व आपल्या धंद्याला हळूहळू स्थाइकत्व आणलें. सखारामशास्त्री यांची वैद्यकी कृष्णशास्त्री यांचे सहकारितेवांचून इतकी फलास आली नसती. कृष्णशास्त्री यांस मूळचें वैद्यकीय ज्ञान मुळींच नव्हतें. किंबहुना सखारामशास्त्री हेहि पढीक वैद्य नव्हते. सूक्ष्म बीजें ग्रहण करून फलवती होण्याचें जें सामर्थ्य पृथ्वीमध्यें दिसतें, तें सामर्थ्य बुद्धिमान् माणसांच्या मनोभूमिकेंत असतें. ज्याप्रमाणें एखाद्या फळझाडाचे माडे एका कुंडींत तयार करावे आणि मग त्याचा कलमी वृक्ष दुसरेच ठिकाणीं व्हावा, तसा हा प्रकार झाला. आवण पुण्यांतलें आणि त्याची लावणी पनवेलींत. अशी मौज झाली. कृष्णशास्त्री यांना वैद्यकीचें पुस्तकी ज्ञान विशेष नसलें तरी त्यांचें पवित्राचरण, सच्छीलवृत्ति, उत्कृष्ट गृहस्थाश्रम, अत्यंत व्यवस्थितपणा आणि व्यवहारचातुर्य इत्यादि गुणांहीं त्यांनीं या वैद्यकीय रोपाची उत्तम जोपासना केली. शहाजीचें कार्य लक्षांत येत नाहीं. शिवाजीचें येतें. पण खरोखर शिवबाची भूमिका शहाजी आणि जिजाबाई यांनींच तयार केली.

त्याप्रमाणें कृष्णाशास्त्री ह्यांनी आर्यौषधि कारखान्याचा पाया घातला. तो पाया निर्जीव दगडांचा नव्हता. झाडांच्या मुळांप्रमाणें महत्त्वाकांक्षेचीं खोल मुळें त्याला होतीं. यामुळें पायाचे मानानें पुढली इमारत फारच मोठी याचा विस्मय वाटण्याचें कारण नाहीं. महत्त्वाकांक्षेचें मूळ विष्णुतात्या होत. स्वप्रयत्नानें विशेष ऊर्जितावस्थेस आणतां येईल असा वडिलार्जित धंदा बाळपणापासून त्यांच्या नजरेसमोर होता. त्यांचें लक्ष ह्या पुस्तकी शिक्षणापेक्षां त्या धंद्यांतच गुंतलें होतें. हा धंदा कसा वाढवितां येईल, याच विचारांत ते सदा गुंतलेले

असत. त्यांचे स्नेही दत्तोपंत नाना हे कमिशन एजन्सीचाच धंदा करीत होते. जनार्दन महादेव गुर्जर यांचें नांव त्याकाळीं महाराष्ट्रांत महशूर होतें. गांवोगांवीं पुस्तकें व इतर माल पाठविण्याचा दोघांचाहि धंदा होता. जनार्दन महादेव गुर्जरांचा व पुण्याचे गोडबोले बुकसेलर यांचा विशेष ऋणानुबंध असे, यामुळें हे गोडबोलेहि पुराणिकांचे स्नेही झाले. ह्या मित्रमंडळीच्या व्यापाराच्या फैलावाप्रमाणें आपल्याहि औषधांचा प्रसार साऱ्या हिंदुस्थानांत कसा होईल, हा त्यांच्यापुढें प्रश्न होता. याहून फार मोठ्या प्रमाणावर आर्यौषधि कारखाना चालविला तर त्याची गरज आज महाराष्ट्रास आहे, असें त्यांस वाटत होतें. पनवेलसारख्या एका बाजूच्या खेडेंवजाच शहरांत बसून साऱ्या महाराष्ट्रांच्या शरिरांत पसरलेल्या नाड्या तपासण्याचें ठिकाण म्हणजे एक पोस्ट ऑफिस मात्र होतें. एखाद्या शिंकाऊ नोकराप्रमाणें तात्या पोस्टांत तासंतास जाऊन बसत व अगदीं खेड्यापासून तों परमुलुखांतील मोठमोठ्या शहरांपर्यंत टपाल रोजच्या रोज अत्यंत व्यवस्थितपणें कसें फिरविलें जातें, याचें त्यांनीं फार सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण केलें. तें इतकें कीं पुढें पुढें ते त्या विषयांत तज्ज्ञ झाले. व अनेक वेळां टपालाच्या व्यवस्थेंत त्यांच्या सूचना टपाल खात्यास मान्य कराव्या लागत. तात्यांच्या चरित्रांतील ही एक लहानच गोष्ट येथें नमुन्याकरितां सांगितली. ह्यावरून हें लक्षांत येईल कीं त्यांच्या स्वभावांतील कांहीं वैगुण्यामुळें त्यांना पनवेलच्या बाहेर पडून मोठमोठाले उलाढालीचे व्याप करितां आले नाहींत हें खरें असलें, तरी त्यांची चवकस बुद्धि पनवेलींतूनच फार दूरवरचीं धोरणें बांधीत होती. त्यामुळें घरच्या वैद्यकीच्या धंद्यांतील व्यापार हें अंग त्यांनीं उचललें. कृष्णशास्त्री व सखारामशास्त्री यांनीं स्थानिक वैद्यकी चालवावी व

त्यांस विष्णु तात्या यांनीं औषधें तयार करून पुरवावीं, असा श्रमविभाग त्यांनीं आपसांत करून घेतला. पुढें तात्या कधीं कधीं विनोदानें म्हणत कीं मला सन १८८५ सालीं सदुकाकांकडे पोथी वाचल्याबद्दल तीन आणे दक्षिणा मिळाली. तेंच माझें असें भांडवल. सन १८९३ सालापासून ते पनवेलच्या आर्यौषधि कारखान्याचे चालक म्हणून जगापुढें आले.

त्यापूर्वींही मधून मधून आतकर गांवीं जाऊन तेथें कांहीं दिवस राहून ते भस्में वगैरे औषधें तयार करीत, व ठाणें, मुंबई, पुणें येथेंहि वैद्यकीच्या धंद्यानिमित्तच वरचेवर जाऊन येत. सन १८८६ सालीं पुणें वैभवांत आर्यौषधि कारखान्याची जाहिरात फडकूं लागली. तसेंच सन १८९१ चे त्यांचे जमाखर्चावरून असें दिसतें कीं मुंबईचे सुप्रसिद्ध डॉक्टर मोरेश्वर गोपाळ देशमुख, गोविंद बाळाजी खेर, त्याचप्रमाणें पुण्याचे डॉ. गर्दे अशी प्रख्यात डॉक्टर मंडळीहि त्यांच्या औषधांच्या ग्राहक वर्गांत होती. तें तात्यांचेच परिश्रमाचें फळ असावें. त्यांचे आजोबा नारायणशास्त्री व चुलते जनार्दनपंत हे मुंबईस राहात होते, ही गोष्ट खरी. पण नारायणशास्त्री सन १८८४ सालींच वारले. व जनार्दनपंतहि मुंबईस फार दिवस राहिले नसून ते पुढें चरितार्थासाठीं बडोद्यास गेले. यामुळें आर्यौषधि कारखान्याचे परगांवचे ग्राहक व एजन्ट मिळविण्याचें कार्य विष्णुतात्यांनींच सांडू व गुर्जर यांचे साह्यानें केलें असावें असें दिसतें.

सन १८९२ सालीं "सखारामशास्त्री आणि कृष्णशास्त्री वैद्य यांनीं तयार केलेल्या औषधांच्या यादीवर" (१) ठाण्याचा अरुणोदय छापखाना, (२) तात्यांचे मेव्हणे ठाणें येथील पराडकर, आणि (३) मुंबई येथील जनार्दन महादेव गुर्जर एवढींच औषधें मिळण्याचीं ठिकाणें दिलीं आहेत. यांपैकींहि जनार्दन महादेव गुर्जर यांनीं हें काम

करण्यास आपणांपेक्षां दत्तोपंत नाना सांडू हे जास्त लायक आहेत,असें पाहून त्यांनीं तो उद्योग दुसऱ्याच सालीं सांडूंचे गळ्यांत घातला. व तो त्यानंतर सुमारें दहा वर्षें दत्तोपंत सांडू त्यांनीं उत्तम रीतीनें चालविला.

याप्रमाणें सन १८९३ सालीं वैद्यकीसंबंधीं शास्त्रीय भाग व स्थानिक वैद्यकी कृष्णशास्त्री व सखारामशास्त्री ही जोडी पहात असतां आर्यौषधि कारखान्याचें व्यापारी धोरण विष्णु कृष्ण पुराणिक हे त्यांचे एजंट दत्तात्रय कृष्ण सांडू यांच्या सल्लामसलतीनें आंखीत असावेत असें वाटतें. संवत् १९४९ अखेर प्रसिद्ध झालेल्या "औषधें घेण्याची रीति" नामक पुस्तकांत सखारामशास्त्री व कृष्णशास्त्री यांचीं नांवें गळलीं आहेत. व तीर्थरूपांस पाठीराखे ठेवून त्यांनीं हातीं घेतलेलें कार्य उमेदीनें पुरें करण्यास विष्णु तात्या पुढें येत आहेत, असा देखावा संवत् १९५० चे आरंभीं दिसून येतो. त्या सालीं ग्राहकांस उद्देशून तात्यांनीं प्रथमच दोन शब्द लिहिले ते जसेच्या तसेच येथें देत आहे.

## दोन शब्द.

**औषधें घेण्याची रीति**—हें पुस्तक सुधारून तयार करण्याविषयीं तीर्थरूपांनीं आज्ञा केल्याप्रमाणें त्याची ही **पांचवी आवृत्ति** तयार करून लोकांस सादर करण्यांत येत आहे. परिशिष्टांत—स्थलसंकोचास्तव—त्रोटक रीतीनें कांहीं सूचना दिल्या आहेत.

एकंदर रचनेंत हस्तदोष, नजरचुका, समजूत न पडणारा मजकूर यांचा स्वाभाविक समावेश होणें शक्य आहे. त्याबद्दल क्षमापूर्वक सशास्त्र, सप्रेम व मोकळ्या अशा मनानें पत्रव्यवहारद्वारें दिग्दर्शन झाल्यास उपकारास्पद होणार आहे.

ह्या **आर्यौषधींच्या कारखान्या**ची आणि त्यांतील औषधांची माहिती व खात्री ह्यांच्या प्रसारामुळें कारखान्यासंबंधानें विशेष रीतीनें

दक्षता, कर्तव्यता, ह्यांची जबाबदारी जसजशी वाढत आहे, त्याप्रमाणें त्या जबाबदारीचीं सूत्रें सुयंत्र चालावीं अशी योजना चालली आहे. ह्या सर्व कारणांनीं दर्शविलेला **हेतु** ईश्वरकृपेंकरून हितचिंतकांच्या साहाय्यानें लवकरच सिद्धीस जाईल असें धोरण दिसतें. असा सुदीन ईशकृपें लवकर येऊन मनोरथ पूर्ण होवो.

८-११-९३ ] **विष्णु कृष्ण पुराणिक,**

**चालक** आर्यौषधींचा कारखाना—पनवेल.

याप्रमाणें पुस्तकाची प्रस्तावना लिहिल्यानंतर ते पनवेलच्या कारखान्याचा परिचय वाचकांस करून देतात, तोहि एक वेळ त्यांच्याच शब्दांत येथें देतों.

"१ **हेतु**—राजाश्रय, विपुलता वगैरे कारणांनीं इंग्रजी औषधांचा खप इकडे फार होत आहे. तीं औषधें तयार करणारे स्वतंत्र; व विकत घेणारे किंवा उपयोग करणारे स्वतंत्र. म्हणजे त्यांचा उपयोग करणाऱ्या डाक्टर लोकांस तीं तयार करण्याच्या कारखान्यांतून आयतींच मिळतात. आणि गरज भागविणारा पदार्थ पुढें असलेलाच बरा वाटतो; अशी इंग्रजी औषधांची तूर्त सोय आहे. आपल्या आर्यौषधींच्या बहुगुणत्वाबद्दल सर्वत्र खात्री आहे; परंतु त्याचा लोप होण्यास जीं कारणें आहेत, त्यांतील मुख्य कारण त्यांची होत चाललेली दुर्मिळता हें एक होय. सशास्त्र औषधें तयार करणें व वैद्यकी करणें ह्या दोन्ही गोष्टी एकाच व्यक्तीस दुर्घट होत. आणखी सशास्त्र व अनुभविक औषधें तयार करण्याचें काम साधारण प्रमाणानें होणें अशक्य. खर्च फार, मेहनत अतोनात व रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून बसल्याप्रमाणें दक्षता पाहिजे. असें होण्यास **आर्यौषधींचा स्वतंत्र कारखानाच** होणें इष्ट. असा सर्व विचार मनांत येऊन आर्यौषधींचा उपयोग करणाऱ्या डॉक्टर, वैद्य, रोगी आणि कुटुंबवत्सल यांस हवें तें आर्य-

वैद्यशास्त्रोक्त औषध आयतें व विपुल मिळावें अशी सोय व्हावी ह्या हेतूनें हा **वैद्यशास्त्रोक्त आर्यौषधींचा कारखाना** सुरू केला आहे.

२ आमचे वैद्यक्रियेचे आरंभक व अनुभवशिक्षक तीर्थस्वरूप वे० शा० सं० सखारामशास्त्री व आम्ही आज **तीस चाळीस वर्षें** आर्यौषधींचा अनुभव घेत आलों. तसाच आम्हांकडील औषधांचा अनेक डॉक्टर, वैद्य, रोगी व कुटुंबवत्सल ह्यांसही अनुभव येऊन ह्या औषधाचा कारखाना सुरू करण्यास व त्याची प्रसिद्धि करण्यास वेळोवेळीं त्यांच्या सूचना आल्या त्याप्रमाणें हळूहळू वाढत जाऊन व सुधारणा होऊन ह्या कारखान्यास हें आजचें रूप आलें आहे.

३ डॉक्टर, वैद्य व रोगी ह्यांस **हवें तें औषध** मिळेल. तयार नसेल तर नियमित यथावकाशांत तें **तयार करून देणें** किंवा दिलेल्या पाठाप्रमाणें तयार होऊन मिळणें अशी या कारखान्यांत सोय आहे.

४ **औषधयोजना करणें**--तर रोग्याचें नांव, वय, रोगाचीं लक्षणें, किती दिवसांचा आजारीपणा, काय उपचार केले, त्यांचे परिणाम, देशस्थिति, गृहस्थिति, लहानपणापासूनची ऐकलेली व पाहिलेली हकीगत, इत्यादि स्पष्ट आम्हांस **पनवेल** मुक्कामीं कळवावें. उपाय कळवूं किंवा औषध पाठविण्याचे किंमतीचा अजमास कळविला असल्यास त्याप्रमाणें औषध पाठवूं.

याप्रमाणें सन १८९३ सालीं तात्यांनीं कारखान्यांचीं सूत्रें आपले हातांत घेतांना त्यांचे काय विचार होते, त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन झालें. पण त्यावेळीं महाराष्ट्रांत अशा प्रकारच्या कारखान्याची किती गरज होती, व ती या कारखान्यानें कशी भरून काढली याबद्दल योग्य कल्पना येण्यासाठीं सन १८९४ सालच्या भिषग्विलास या डॉ. रानडे यांनीं सोलापूर येथें चालविलेल्या वैद्यकीय मासिकांत संपादकांनीं

जो एक मननीय लेख प्रसिद्ध केला, त्यांतील विस्तृत उतारा येथें उद्धृत करीत आहें. समकालीन तज्ज्ञांचे हे विचार पनवेलच्या आर्यौषधि कारखान्याचे इतिहासाचे दृष्टीनें फार महत्त्वाचे आहेत. म्हणून ते सविस्तर पुढें दिले आहेत.

" २. पेशवाई इ. स. १८१८ मध्यें लयास गेली. तोंपर्यंत आपले वैद्यकास राजाश्रय थोडाबहुत असल्यामुळें व आपल्या वैद्यकाशिवाय रोगपरिहाराचें अन्य साधन नसल्यामुळें कांहीं उत्तम पढिक वैद्य असत व त्यांचा धंदाही बरा चाले; आणि त्यामुळें लोकांस वैद्यकीचा उपयोग चांगला होई. जरी पेशवाईच्या अमदानींत नवे शोध व वैद्यकावर नवे ग्रंथ म्हणण्यासारखे झाले नाहींत, तथापि पूर्वींच्या पद्धत्यनुसार शिकून थोडे तरी राजवैद्य ह्या पदास पोंहचत असत. अर्थात् त्यांस द्रव्याचें पूर्ण साहाय्य असल्यामुळें त्रैलोक्यचिंतामणी-सारख्या मात्रा व रसायनें सशास्त्र अशीं तयार होत असत, व त्यामुळें तीं मोठीं गुणकारी होत. पण पुढें राजाश्रयाचा लोप होतांच राजवैद्य व त्यांचे बरोबर राजौषधि हळूं हळूं लयास जाऊं लागल्या. अशा स्थितींत सुमारें पंचवीस वर्षें गेलीं. तेवढ्यांत ह्याहीपेक्षां वैद्यकी ऱ्हास पावून वैद्यपरंपरा बुडाली; वैद्य ह्या पदास योग्य अशीं माणसें फारच थोडीं राहिलीं. पुढील पंचविशींत तर तीही स्थिति जाऊन वैद्यक बायाबापड्यांच्या व बाडी वैद्यांच्या हातांत पडलें. अर्थात् लोकांना त्याची योग्यता कमी वाटून इंग्रजी वैद्यक त्यांचे डोळ्यापुढें मांडलें गेल्यामुळें तेंच त्यांना आवडूं लागलें. असें होतां होतां अलीकडील तिसऱ्या पंचविशींत तर इंग्रजी वैद्यकाचा पगडा पूर्ण बसला. अशी आजची स्थिति ठाम साक्ष देत आहे. सगळ्या मुंबई इलाख्यांत पढिक वैद्य असे बोटांवर मोजतां येण्यापुरते सुद्धां असतील कीं नाहीं याची शंकाच! इंग्रजी वैद्य जागजागीं खेड्यापाडीं आपण पाहतों.

इंग्रजी औषधांनीं आपल्या औषधांची किती परीनें जागा व्यापली ह्याचा अनुभव प्रत्येक शहरच्या रहिवाशांस आहे. मात्र ह्याच पंचविशींत जाहिराती-औषधांचें एक मोठें बंड माजलें. ह्या बंडानें वैद्यकाचे उन्नतीस उपयोग होण्याचें एकीकडे राहून तें त्याच्या अधिक नाशास कारणीभूत होत आहे, व ह्याचा पुरावा करणें अगदीं सोपें आहे. ज्यानें उठावें त्यानें भपक्याच्या जाहिराती द्याव्या व अज्ञान लोकांनीं त्यांच्या अपूर्व शब्दलाघवास भुलून एकवार तरी औषध घेऊन फसावें व मनांतल्या मनांत चुरमुरे खावे, असा प्रकार पाहण्यांत येतो. जो मनुष्य परवां मिस्त्रीचें काम करणारा, खर्डे घासणारा किंवा मास्तरकी करणारा पहावा तो बनतो वैद्यबोवा व झोकतो लांब लांब जाहिराती ! सारांश, अशा प्रकारानें आपलें वैद्यक शिकण्यास मुळींच उत्तेजन येत नाहीं, औषधांवरचा भरंवसा उडतो, व सोन्यासारख्या वैद्यकास काळिमा लागतो. जाहिरातींचें अनुकरण इंग्रज लोकांचें खरें, पण तें करतांना आपल्या हिताहिताचा विचार केला पाहिजे. पण ‘ विनाशकाले विपरीत बुद्धि ’ ह्या म्हणीप्रमाणें आमची स्थिति झाल्यामुळें देशहितास आम्ही मुकत आहों. ह्या जाहिराती-औषधासंबंधानें आंजच्या प्रसंगीं अधिक न लिहितां इतकेंच सांगणें पुरें आहे कीं, तीं औषधें किंवा ते करणारे लोक आमच्या वैद्यकाची उन्नति करणारे नसून त्याच्या ऱ्हासास सर्वतोपरी कारणीभूत होत आहेत. इकडे ही स्थिति, व तिकडे पहावें तर राजाश्रयावर इंग्रजी वैद्यक बळावून इंग्रजी औषधांनीं देश उजाड होण्यास साह्य होत आहे. तेव्हां अशा अडचणींतून पार पडण्यास, आपलें वैद्यक सुधारण्यास व औषधांचे रूपानें समुद्रतीरापलीकडे जाणारे द्रव्याचा मार्ग कुंठित करण्यास एकंच उपाय आहे, तो हा कीं, पाश्चिमात्य लोकांचें ज्ञान संपादन करून आपल्या वैद्यकास जोडावें व आपलींच औषधें यथा-

शास्त्र किंवा सांप्रतच्या ज्ञानानुसार त्यांत फेरबदल करून तयार करावीं व तीं इंग्रजी औषधांचे जागीं वापरावीं. एवढी गोष्ट अमलांत आली कीं, आमचें वैद्यक सुधारलेंच म्हणून समजावें. मात्र ह्या कामास तूर्त तरी राजाश्रय मिळण्याचा संभव नसल्यामुळें आपलें आपणच खटपटीस लागलें पाहिजे, व त्या खटपटींपैकीं मुख्य खटपट म्हटली म्हणजे आपलीं शास्त्रोक्त औषधें खात्रीपूर्वक तयार करण्याचे मोठमोठे कारखाने सुरू झाले पाहिजेत."

३. "आजपर्यंत आपला संप्रदाय असा आहे कीं, वैद्यांनींच घरीं औषधें तयार करावयाचीं व त्यांनींच रोग्यास औषधउपचार करावयाचे. म्हणजे एकाच मनुष्यावर दोन्ही गोष्टींचा बोजा पडल्या-मुळें तो कितीही विद्वान, मेहनेती व सदृढ असला, तथापि त्यांत त्यास प्रवीणता जशी यावी तशी यावयाची नाहीं. सारांश, दोन्ही बाबी सारख्याच महत्त्वाच्या असल्यामुळें त्या निरनिराळ्या माणसांनीं हातांत धरल्यावांचून उदय पावावयाच्या नाहींत. श्रमविभाग झाल्यानें जो तो आपापल्या शाखेकडे अधिक लक्ष्य पोंचविण्यास समर्थ होऊन तींत दिवसेंदिवस अधिक सुधारणा केल्यावांचून राहाणार नाहीं, व अशावांचून सांप्रतच्या पारतंत्र्याच्या स्थितींत आपल्या वैद्यकाचा उदय होण्यास दुसरा मार्ग नाहीं."

४. "सारांश, ग्रंथोक्त औषधें तयार करण्याचे मोठमोठे कारखाने निघणें हें एक आपले वैद्यकाचा उदय होण्यास मुख्य साधन आहे. सद्यःस्थिति पाहूं गेलें तर कारखाना ह्या नांवास योग्य **असा एकच पनवेल येथील** कारखाना आमचे पहाण्यांत आला आहे. इतर पुष्कळ ठिकाणीं मोठमोठे कारखाने सुरू केल्याबद्दल जाहिराती पाहण्यांत येतात, परंतु त्यांसंबंधीं बारकाईनें चौकशी करितां नुसत्या जाहिरातींपलीकडे प्रत्यक्ष असें कांहींच दृष्टीस पडत नाहीं. कित्येक

कारखान्यांचे उत्पादक पाहावे तों त्यांना वैद्यशास्त्राचा किंवा निदान रसायनादि क्रिया करण्याच्या ज्ञानाचा गंध सुद्धां नसतो. कित्येकांचीं औषधें पहावीं तों निवळ सोंदेगिरी, असा प्रकार दृष्टीस पडतो. इतकेंच नव्हे, पण कित्येक खप्पी नुसतीं व्ही. पी. पार्सलें करून ग्राहकांस फसवितात; त्यामुळें वारंटें काढून त्यांस पकडावें लागतें. सरासरी वारंटांतून मोकळे झाले कीं, जाहिराती बदलून निराळी सही केली कीं, लागले आपल्या उद्योगास ! कित्येक उत्पादक मूळचे पुराणिक, कारकून असून आणि त्या धंद्यांत बहुतेक आयुष्य घातलें असून पुढें पहावें तों दवाखाने काढतात, वाटेल तशा जाहिराती देतात, आणि बाहेरगांवच्या लोकांस झुलवून मजा मारतात. असो. असा प्रकार सर्वच करितात असें जरी म्हणतां येत नाहीं, तथापि पुष्कळ ठिकाणीं हीच गम्मत दृष्टीस पडते ह्यांत संशय नाहीं. सारांश कारखाने काढावयाचे ते 'गुप्त' 'रामबाण' 'अप्रतिम' अशा विशेषणांच्या औषधांकरितां नसून शास्त्रोक्त पाठप्रमाणें काळजीपूर्वक केलेलीं अशीं खात्रीचीं औषधें तेथें तयार झालीं पाहिजेत. अशा प्रकारचा पनवेल येथील पुराणिकांचा कारखाना आहे, असें आम्हीं समक्ष पाहतां आढळून आलें. हा कारखाना आरंभ झाल्यास तीस वर्षांवर दिवस झाले असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण तेव्हां तो अगदीं अल्पसा होता व पनवेलच्या बाहेर तो कोणासही माहित नव्हता. त्या वेळची त्याची स्थिति एखाद्या वैद्याच्या चरितार्थासाठीं जुन्या सांप्रदायानुरूप स्थापिलेल्या वैद्यशाळेपलीकडे नव्हती. त्या वेळच्या पहाणारांस किंबहुना उत्पादक यांस आपल्या शाळेस आजची स्थिति पोंचेल असें स्वप्नीं-सुद्धां आलें नसावें. पण घराणें बाळबोध व पिढ्यान्‌पिढ्या वैद्यकीचें असल्यामुळें अध्ययन, अध्यापन, औषधांचा संग्रह व रोग्यांस औषधोपचार इत्यादि गोष्टी चालत आल्यां. अलीकडे १४-१५ वर्षां-

पासून तें स्वरूप हळूंहळूं बदलून दिवसानुदिवस त्यांत अधिकाधिक सुधारणा होत आली. व ह्या सर्वांस कारण मूळ उत्पादकास मदत करणारा व काळानुसार कारखान्यास दिशा दाखविणारा असा चालक पुत्र मिळाला. त्यानें कारखान्याचे दोन भाग करून रोग्यास औषधोपचार, ग्रंथावलोकन, अध्यापन, इत्यादि उतार वयास योग्य बाबी वडिलांकडे सोंपवून त्यांच्या फक्त देखरेखीखालीं आपण मोठ्या प्रमाणावर शास्त्रोक्त औषधें तयार करण्याची शाखा आपल्या अंगावर घेतली. अर्थात् श्रमविभाग होऊन दोन्ही शाखा सुधारत चालल्या. इंग्रजी केंप कंपनीप्रमाणें जिकडे तिकडे साफसुफ, लखलखाट, भव्य इमारत, इत्यादि भपकी व्यवस्था आज जरी तेथें पाहण्यांत येत नाहीं, तथापि मोठ्या आवारांत पैस अशा इमल्यामध्यें सारखे दहा पंधरा गडी खलाचें व कुटण्याचें काम करीत आहेत; भट्यांसाठीं मोठी चिमणी असून तिच्याखालीं अनेक भस्मांच्या भट्या लागल्या आहेत; भट्यांच्या सोईसाठीं लोखंडी रुळांचें चक्र व त्यावर लोखंडी गाड्या केल्या आहेत; एका बाजूस निरनिराळ्या वनस्पती नीट नेटक्या करून भरून ठेविल्या आहेत; दुसऱ्या बाजूस रिकाम्या बाटल्यांचे ढीग पडले आहेत. एका दालनांत शेंकडोंशें बरण्या आसवांनीं, आरिष्टांनीं भरून तयार असून त्यांवर तयार केल्याचें वर्ष व नांव इत्यादि मोठ्या अक्षरांनीं लिहिलेल्या चिठ्या मारल्या आहेत; मात्रा, रसायनें, इत्यादि मौल्यवान औषधांनीं कपाटें भरलीं आहेत; आसवांसाठीं कोरफडांचे ढीग, मणच्या मण मध इत्यादि द्रव्यांची सिद्धता आहे; ऑफिसांत जमाखर्च, पत्रव्यवहार, आणि औषधांच्या मागण्याप्रमाणें औषधें पाठविण्याची तयारी चालली आहे; आल्या गेल्यास चालक माहिती देत आहेत; इत्यादि मनोहर, व्यवस्थित, उद्योगदक्ष व यथासांग व्यवस्था पाहून मन मोठें समाधान पावतें व

आपल्या वैद्यकाचा जीर्णोद्धार होण्याचा समय जवळ आला आहे, असें त्यास वाटतें. हळूं हळूं कारखान्यांत भर घालतां घालतां आजवर सगळ्या कारखान्यांतील औषधें वगैरेंची बेरीज करूं लागलें तर पंचवीस तीस हजारांचा माल व सामुग्री तयार आहे. कांहीं विद्यार्थीही शिकत आहेत, व दरसाल औषधांचा खपही अधिकाधिक वाढत आहे. चालकांची व्यवस्था, टापटीप, उमेद, पैशाची स्थिति, उद्योग व देशकल्याणाची कळकळ, इत्यादि गोष्टी पाहतां हा कारखाना आमच्या भावी वैद्यकीच्या सुधारणुकीचा द्योतक आहे असें वाटल्यावांचून रहावत नाहीं. त्यांना लोकांचा आश्रय व पाठबळ मिळाल्यास थोडक्याच काळांत वैद्यकाच्या आजच्या स्थितींत महदंतर होणार आहे, असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं."

५ "अलीकडे बऱ्याच इंग्रजी पद्धतीनें शिकलेल्या डॉक्टर लोकांचें व वर्तमानपत्रकर्त्यांचें लक्ष ह्या कारखान्याकडे लागलें आहे. मुंबईची बरीच डॉक्टर मंडळी कारखाना पाहून खुष झाली आहे, असें त्यांनीं दिलेल्या दाखल्यांवरून स्पष्ट दिसतें. डॉ. कावसजी एल. एम. एस., डॉ. चिनालालजी गेडेरिया एल. एम. ॲन्ड एस. इत्यादि मंडळीस तर हा कारखाना फारच आवडला. ज्ञानोदय ( बातमीदार ) सुधारक, कट्टा देशाभिमानी पुणें वैभव, अरुणोदय, प्रसिद्ध गुजराथी पत्र जामेजमशेद इत्यादि पत्रकर्त्यांनीं समक्ष पाहून ह्या कारखान्याची मोठी तारीफ केली आहे."

याप्रमाणें भिषग्विलास ह्या मासिकांतील संपादकीय लेखाचा उतारा आहे.

**क्षेत्रं पुरुषाकारस्तु दैवं बीजमुदाहृतम् ।**
**क्षेत्रबीज समायोगात्ततः सस्यं समृध्यते ॥**

महाभारत १३।६।३८

[ उद्योग हें शेत व दैव हें बीं आहे. हें शेत व बीं यांचा संयोग झाला म्हणजे उत्तम प्रकारचें पीक येतें. ]



# प्रकरण १२ वें.

## पितापुत्रांचें आणखी वैशिष्ट्य.

**यस्मिन् कुले यः पुरुषः प्रधानः स सर्वयत्नैः परिरक्षणीयः ।**
**तस्मिन् विनष्टे कुलसारभूते न नाभिभङ्गे ह्यरवो वहन्ति ॥ १ ॥**

[ ज्या कुलांत जो मुख्य कर्तृत्ववान् पुरुष असेल तो सर्व यत्नेंकरून रक्षण करण्यास योग्य आहे. कारण तो कुलाचा सारभूत पुरुष नाश पावेल, तर जसें गाडीच्या चक्राचा मध्य मोडल्यानें आरे राहूं शकत नाहींत, तसे बाकीचे अनाथ झाल्यानें कुटुंब विस्कळीत होऊन चालत नाहीं. ( प्र. सा. ९२१ )]

आर्यौषधि कारखान्याचीं सूत्रें तात्यांनीं आपल्या हातीं घेतल्यावर कारखाना चांगलाच भरभराटीस येऊं लागला. याचें कारण ते अत्यंत महत्त्वाकांक्षी असून त्यांनीं आपल्याला त्या कार्यालाच सर्वस्वी वाहून घेतलें. व्यवहारी पुरुष आणि असामान्य बुद्धिमत्तेचे व कर्तृत्वाचे पुरुष यांच्यांतील भेद लक्षांत घेण्यासारखा असतो. व्यावहारिक पुरुषाची दृष्टि विभागलेली असते. तो कुटुंबाचा उत्तम कर्ता असतो. संसार टापटिपीनें करून सर्वांचें रक्षण व संगोपन समबुद्धीनें कसें करावें, हें तो चांगलेंच जाणतो. तो उत्तम नागरिकहि असूं

शकतो. आपल्या गांवांतील लहान मोठ्या सार्वजनिक कामांत पुढाकार घेऊन आपल्या निरालस वृत्तीनें, उद्योगतत्परतेनें व सौजन्यानें तो सर्वांना हवासा वाटतो. त्याच्या विरुद्ध कोणीच कधीं निंदा करितांना ऐकूं येत नाहीं. अशा रीतीनें कुटुंबव्यवस्थां व ग्रामव्यवस्था उत्तम रीतीनें चालण्यास व्यवहारचतुर व आंग मोडून काम करणारे सौम्य वृत्तीचे इभ्रतदार असे पुरुष लागतात. कृष्णशास्त्री यांचे ठिकाणीं हे सर्व गुण वसत होते. ते श्रीमंत नसले तरी इभ्रतदार होते, विद्येंत पूर्ण नसले तरी धूर्त व बुद्धिमान् होते, तसेंच ते सौम्य असले तरी करारी होते. आणि प्रापंचिक असले तरी लोभी नव्हते. 'वेळ आल्यास घरांतून उठून देवळांत कायमचा जाऊन बसेन' अशी त्यांच्या मनाची केव्हांहि तयारी होती.

तात्यांची कोटि याहून भिन्न होती. भावनाप्रधान पुरुष कोणत्या तरी एखाद्याच विषयांत सदा गुंग झालेला असतो. त्याशिवाय तो दुसरें तिसरें फारसें कांहींच जाणत नाहीं. त्याचा भावनेचा विषय हेंच त्याचें सर्वस्व असतें. त्या कार्यापुढें त्याला कौटुंबिक जबाबदारीची व नागरिक कर्तव्याची मातब्बरी वाटत नाहीं. त्याचें जें ध्येय तोच त्याचा देव. त्या ध्येयरूप देवाच्या उपासनेंत कोणी यत्किंचित् प्रत्यवाय आणला तर तो त्याला खपत नाहीं. साऱ्या कौटुंबिकांनीं, नागरिकांनीं, नव्हे साऱ्या जगानें त्याच्या त्या एकनिष्ठ ध्येयोपासनेंतच त्यास अनुकूल व्हावें, अशी त्याची अपेक्षा असते. लोक त्याच्या एकांतिक विक्षिप्त वृत्तीला काय म्हणतात, याची तो परवा करीत नाहीं. तात्या पुराणिक ह्या वृत्तीचे होते. तेहि त्यागी होते. पण त्यांचा त्याग केवळ निरपेक्ष नव्हता. त्यांच्या ध्येयासाठीं किंवा धर्मासाठीं ते वाटेल तितका त्याग करण्यास तयार असत.

कर्तृत्वानें जो ज्येष्ठ त्याच्याच हातीं सर्व सत्ता असावी, इतरांनीं त्याच्या तंत्रानें वागावें, व त्यास सर्व प्रकारच्या सवलती व अधिकार द्यावे, असे त्यांचे विचार असत. एकत्र कुटुंबपद्धतींत एकानेंच सदा कष्ट करावे व बाकीच्यांनीं सत्तेंत मात्र फुकट समान हक्क सांगावे, असें कोठें कोठें होतें, तें त्यांस पटत नसे. ते म्हणत कीं कुटुंबांत जो खरा कर्ता आहे, त्याच्या विशेष प्रकारच्या सुखसोयींस इतरांनीं जपलें पाहिजे व त्यास एकसूत्री वागूं दिलें पाहिजे.

तात्यांच्या स्वभावांतील दुसरा विशेष म्हणजे त्यांची कार्यावर दृष्टि असे. स्वार्थावर कधींच नसे. ते कार्याचा अथवा संस्थेचा स्वार्थ दक्षतेनें संभाळीत. पण व्यक्तीच्या स्वार्थाकडे त्यांचें कधींच लक्ष नसे. ते विलक्षण त्यागी होते. भोगी नव्हते. व्यावहारिक कोटींतील माणसें विषयासक्तच असतात असें नव्हे. पण व्यवहारी माणसें त्यागीहि नसतात. त्यागानें अमृतत्व प्राप्त होतें. पण व्यवहार पुरा होत नाहीं. असें व्यवहारी माणसें मानतात. कोणत्याही एकाच विषयासाठीं तीं वेडावलेलीं नसतात. त्यांचे प्रेमाचे अनेक विषय असतात. परम प्रेमाचा कोणताच नसतो. यामुळें एकाचे परम प्रेमासाठीं तद्‌व्यतिरिक्तांचा त्याग करावा, अशी त्यांची वृत्ति नसते. जगांत दोन्ही कोटींतील माणसांची गरज आहे. आगगाडीला ज्याप्रमाणें एंजिनें एक किंवा फार तर दोन असतात, पण डबे पुष्कळ. त्याप्रमाणें प्रचंड प्रेरक शक्तीचीं अशीं कर्तृत्ववान् माणसें थोडीं, केवळ संग्रहकारी माणसें अनेक, अशीच जगाची स्थिति आहे. त्यागी माणसांच्या भावनेला तितकाच जबरदस्त हेतु लागतो. कोणतीहि क्रिया मग ती त्यागाची कां असेना निर्हेतुक संभवत नाहीं. अनेक एषणांपैकीं एखाद्या एषणेसाठीं इतर एषणांचा त्याग संभवतो. तात्यांची महत्त्वाकांक्षा फारच मोठी असे. पण त्या महत्त्वाकांक्षेला अधिष्ठान धर्मभावनेचें असे. स्वार्थाचें, किंवा सुखोपभोगाचें नसे.

तात्यांना भोगांसंबंधीं अरुचि असे. त्यांनीं स्वतांची चैन अशी कधींच केली नाहीं. कपडालत्ता, खाणेंपिणें, आहारविहार, गप्पा-गोष्टी, नाटकें पाहाणें, गाणें बजावणें, खेळत बसणें, वृथाटव्य-सकाळ संध्याकाळ उगाच फिरायला जाणें, इत्यादि कोणत्याच प्रकारच्या चैनबाजीचा नाद-नव्हे-विटाळहि त्यांना नव्हता. विशेष कामावांचून ते कधीं कोणाकडे गेले नाहींत. अष्टौप्रहर आपलें काम आणि आपण अशी त्यांची अनन्यसाधारण कार्यनिष्ठा असे. त्यांच्या एवढ्या अवाढव्य कारखान्यांत पूर्वीं एकहि खुर्ची नसे. कोणालाही बसायला गादी तक्या नसे. कामाच्या वेळीं कोणीहि रेंगाळतां कामा नये. काम म्हणजे काम. असा त्यांचा कडक लष्करी बाणा असे. अशा असामान्य वृत्तीच्या पुरुषाला असें वाटणें स्वभाविक होतें कीं, या आर्यौषधि कारखान्याचीं सारीं सूत्रें आपल्या हातीं असावीं. आणि आपल्या पश्चात आपल्याचप्रमाणें कार्यनिष्ठ व निःस्वार्थी अशाच पुरुषाकडे कारखान्याचें चालकत्व राहावें. मग तो चालक आपला कौटुंबिक असो किंवा परकौटुंबिक असो. ज्याप्रमाणें एखादा कर्मठ उपासक मरतांना आपले उपासनेचे देव आपल्या अधार्मिक भाऊबंदांपेक्षां धर्मनिष्ठ अशा परक्यालाहि देण्यास राजी असतो; तसाच हा प्रकार आहे.

एखाद्या भाविकाच्या उपासनेच्या मूर्तीप्रमाणेंच पुराणिकांचा आर्यौषधि कारखाना तात्यांचा ध्येयरूप होता. आणि त्या ध्येया-संबंधीं त्यांना असें परम प्रेम वाटे कीं, हा कारखाना पुराणिकांचा नव्हे, माझाहि नव्हे, हा श्रीधूतपापेश्वराचा आणि श्रीधूतपापेश्वराचे जे परम कार्यनिष्ठ सेवक त्यांनींच तो चालवावा, अनधिकारी मांण-सांनीं त्यांत ढवळाढवळ करूं नये किंवा आपण कसलाहि हक्क सांगूं नये.

वयांत येत जाणाऱ्या मुलीला पुढें अनेक मागण्या येतील व बखेडे पडतील, यास्तव ती अगोदरच देवाला वाहून मोकळें व्हावें, अशा विक्षिप्त कल्पनेप्रमाणेंच तात्यांची वरील कल्पना व्यावहारिकांस वाटण्यासारखी होती. अर्जुनानें जिंकून आणली म्हणून काय झालें, द्रौपदी पांची पांडवांची, अशा कुंतीच्या बुद्धीनेंच एकत्र कुटुंबांतील व्यवहार चालत असत. परंतु विशेषेंकरून जेथें अशा एका संघटित आणि उत्कर्षशील अशा अत्यंत उपयुक्त संस्थेच्या हिताहिताचा संबंध आहे, तेथें वरील समतेची विचारसरणी तात्यांना अगदीं त्याज्य वाटे. त्यांचा ध्येयरूप कारखाना एकनिष्ठेनें व दृढोद्योगानें कसा वाढवावा, यासंबंधीं तात्यांना एकसूत्रीपणा पाहिजे होता. त्यांच्या वडिलांचे आणि त्यांचे ह्यासंबंधीं विचार जुळते नव्हते. धंदे व्यापारांचें स्वरूप अनिश्चित असतें. यास्तव कारखान्याच्या उत्पन्नांतून जमीनजुमला वगैरे घेऊन कुटुंबाच्या चरितार्थाची शाश्वतची सोय पहावी, असें कृष्णशास्त्री यांचें धोरण होतें. तात्यांचें म्हणणें कारखान्यांतलें उत्पन्न सारें कारखान्यांतच घालावें. पण अशा रीतीनें वाढत जाणारा कारखाना पुढें एकत्र कुटुंबाच्या वांटणीस पात्र होऊं नये, या गोष्टीवर त्यांचा फार कटाक्ष असे. तसेंच कारखान्यासंबंधीं मुख्य मान वडिलांस देऊन चालकत्व एकसूत्री आपलेकडे रहावें, असा त्यांचा आग्रह होता. याप्रमाणें पनवेलचा आर्यौषधि कारखाना ही संस्था नेहमीं अविभाज्य व एकसूत्री राहावी व ती संस्था व्यवस्थित रीतीनें चालविण्यांत संस्थेचा स्वार्थ व परमार्थ दोन्ही साधावे या हेतूनें तात्यांनीं कारखान्याचा उत्सर्ग त्यांचा कुलदेव श्रीधूतपापेश्वर ह्याचे नांवानें करण्याचें मनांत आणलें.

तात्यांची ही कल्पना कृष्णशास्त्री यांस पसंत पडण्यासारखी नव्हती. भावनाप्रधान माणसें भावनेच्या भरांत एखादा भलताच

अविचार करतात, तसलाच हा प्रकार होणार आहे, असेंच त्यांस वाटत असावें. कारण " अण्णांची तुम्ही समजूत घाला, " असें दत्तोपंत सांडूना सांगून तात्यांना या कामीं वडिलांची संमति मिळविण्यास बरेच आयास पडले. येथें हें अवश्य लिहिलें पाहिजे कीं, तात्यांची योजना अत्यंत निर्लोभीपणाची होती. त्यांना स्वतांला नांवाचा मोठेपणाहि नको होता. श्रीधूतपापेश्वराचे प्रतिनिधी वडिलांनींच व्हावें व संस्थेचा सारा पैसा-अडका त्यांनींच संभाळावा. फक्त चालकत्व आपणाकडे राहावें, अशी त्यांची योजना होती. तात्यांची ही कार्यनिष्ठा जशी प्रशंसनीय होती, त्याचप्रमाणें स्वमतविरोध बाजूला ठेवून त्यांना आपल्या तंत्रानें चालूं देऊन आणखी त्याच्या तंत्रानें आपणहि चालण्यांत तात्यांचे वडील व त्यांचे कनिष्ठ बंधु यांनीं जें त्यावेळीं आत्मसंयमन दाखविलें, तेंहि प्रशंसेस पात्र आहे. तसेंच तात्यांच्या अत्याग्रहास्तव त्यांच्या उज्वल भावनेला जरूर तितका वाव देऊन, त्यापुढें त्यांस व्यावहारिक अगर कायदेशीर दृष्टीनें जाऊं न देण्यांत कृष्णशास्त्री यांनीं चांगलेंच व्यवहारचातुर्य राखलें. यास मी व्यवहारचातुर्यच म्हणतों, कारण आज रशियांतील संरकारी सत्तेची योजना जशी उपजतांच निर्जीव झाली आहे, तशीच तात्यांच्या वरील योजनेनें शुद्ध भावनेपलीकडे जाऊन व्यावहारिक कायदेशीर मूर्तरूप धारण केलें असतें, तर त्यांच्या पश्चात्हि आर्यौषधि कारखान्याचा उत्कर्ष होत गेला, तसा तो झालाच असता असें सांगवत नाहीं. देशकाल कांहीं मनुष्याचा मूळ स्वार्थी स्वभाव बदलूं शकत नाहीं. यास्तव केवळ भावनाप्रधान योजना लवकरच अव्यवहारिक ठरतात. स्वत्वनिवृत्ति कशाची करावयाची यासंबंधीं पुरा विवेक व्हावयास पाहिजे. दान, धर्मादाय व केवळ परोपकार यांचे विषय आणि आर्यौषधि कारखाना हा विषय यांत अत्यंत भेद आहे.

असले कारखाने चालविण्यांत जी धकाधक, जें साहस, जो दीर्घो द्योग, जी दक्षता व जो जबरदस्त व्यासंग लागतो, तो केवळ निःस्वार्थ-पणें अखंडित परंपरेनें चालत राहाणें, जवळ जवळ अशक्यच आहे. शिवाय आजचा काल असा विपरीत आहे कीं, आज जो तो आपल्या खऱ्या व काल्पनिक हक्कासाठींच गोंगाट करतो आहे. कर्तव्याची खरी कल्पना व जाणीव क्वचितच कोणाला आहे. सार्व-जनिक संस्थांवर व सार्वजनिक कार्यकर्त्यांवर बेजबाबदारपणें निंद्रा-त्मक लेखांनीं वर्तमानपत्रांतील कित्येक पानें काळीं झालेलीं दिसतात. सार्वजनिक संस्थांना जाब विचारण्याचा वाटेंतल्या टाग्या पोरालाहि हक्क पोंचतो, असें समजतात. पण सार्वजनिक कार्यांतील अडचणी काय असतात व तीं कार्ये करतांना किती धकाधक सोसावी लागते, हें कोणी पाहात नाहीं. "मग तुम्हाला देऊळ बांधायला कोणीं सांगितलें होतें ? मग तुम्हीं शाळा काढलीत कशाला ? आम्हीं दोन आणे वर्गणी दिली असली म्हणून काय झालें ? संस्था जर सार्वजनिक आहे तर आम्हांला तिचा हिशेब मागण्याचा व चालू व्यवस्थेबद्दल जाब विचारण्याचा अलबत् हक्क आहे. इ. इ०" अशा बेजबाबदार टीकाकारांचा या वर्तमानपत्री युगांत वीट येण्याइतका बुजबुजाट झाला आहे ! अशावेळीं निदान पारतंत्र्याचे काळांत दुसऱ्यांचे पगांत न सांपडतां कर्त्या पुरुषांनीं आपल्या अधिकारानें व हक्कानें जें कांहीं लोककार्य करतां येईल तें करीत राहाणें, यांतच शहाणपण आहे. यांतच कांहीं तरी कार्यनिष्पत्ति होऊं शकेल. एका चिता-ऱ्यानें आपलें एक नमुनेदार चित्र रस्त्यानजीक लावून ठेवलें व यांत चूक असल्यास वाटेल त्यानें दाखवावी असें सार्वजनिक आव्हान केलें. दुसऱ्या दिवशीं तें बहुमोल चित्र वेड्या वांकड्या असंख्य फुल्यांखालीं दिसेनासें झालें ! तिऱ्हाइतासारखा बेजबाबदार कोण ?

तेव्हां या बेजबाबदारीच्या धुळवडीपासून कार्यकर्त्यांनीं शक्य तों दूर असावें तें बरें. दुसरें असें कीं, प्रमाणसाहस्रींतील एका सुभाषिताखालीं संपादकांनीं जो एक इषारा दिला आहे, तो व्यावहारिक दृष्टीनें चिंतनीय आहे. ते म्हणतातः—

“ परंतु या परोपकार करण्यामध्यें व भोग भोगण्यामध्यें नियम ठेवावा, कारण शक्तीच्या बाहेर परोपकार करण्यामध्यें निर्धनता प्राप्त होते, व भोग भोगल्यानें रोग व दारिद्र्य येतें. त्यामुळें शरीर व धन दोहोंचाहि नाश होऊन आपल्या कुटुंबामध्यें दुःख येऊन पडतें. प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे कीं, आपल्या हयातींत व मरणानंतर आपल्या कुटुंबाचें भरण–पोषण चांगल्या रीतीनें जसें होईल त्या प्रकारचा आपल्या शक्तीप्रमाणें बंदोबस्त करावा; परंतु ‘ शेजाऱ्यास पीठ द्यावें व घरच्या पोरांनीं जातें चाटावें ’ आणि बाबास मलई द्यावी आणि पोरांनीं ताक प्यावें, या प्रकारचा घर विकून प्रयोजन करण्यासारखा परोपकार व भोग कधींहि करूं नये; तर नेहमीं नियमानें वागावें. ”

सारांश, “ माझ्या घरचीं बायका मुलें हीं सारीं ईश्वराचींच लेंकरें आहेत व तीं त्यानें संगोपनार्थ माझे स्वाधीन केलीं आहेत. त्यास्तव त्याची आज्ञा म्हणून त्याच्या सेवेप्रीत्यर्थ मी यांचें संगोपन करींत आहें ” अशा प्रकारची प्रपंचांत भावना ठेवणें उत्तमच. पण त्यासाठीं घरांतील बायकां–मुलांस देवाच्या पायांवर वाहावें लागत नाहीं. व त्यांच्याशीं असलेले आपले नात्याचे हितसंबंध तोडावेहि लागत नाहींत. नाटकांतला संसार मिथ्या असला तरी बरोबर करावा लागतो. त्यास नटाची आवड व त्यास मिळणारें वेतन ह्या दोन गोष्टी प्रेरक असतात. दुसऱ्याच्या मुलांचें दाई जसें अंगत्यपूर्वक संगोपन करिते, तसा निःसंगतेनें प्रपंच करावा, असें संत सांगतात. पण याहि उदाहरणांत दाईच्या ठिकाणची स्वाभाविक वत्स-

लता आणि वेतन मिळविण्यासंबंधीं तिची गरज हीं दोन्हीं पुरीं होत असतात. परोपकाराची आवड विरळ आणि वैयक्तिक असते. स्वार्थ हा स्वाभाविक आहे. यास्तव धनोत्पादक धद्योगधंदे केवळ निःस्वार्थ-बुद्धीनें पिढ्यान्पिढ्या उमेदीनें चालत राहाणें अत्यंत दुर्घट आहे. सर्व सत्ता ईश्वराची तर खरीच. पण ईश्वराची म्हणजे अनेकमुखी समाजाची नव्हे. ईश्वरार्पण ही भावना आहे. जेथें प्रत्यक्ष घेणारा कोणी नाहीं तेथें देणारा कोणाचे स्वाधीन काय करील? देवाला नैवेद्य दाखवावा व तो आपणच सेवन करावा ही कांहीं थट्टा नव्हे. हाच व्यवहार आहे. ज्यांना ईश्वरमूर्तीला जेवायला लावण्याचें सामर्थ्य नाहीं, त्यांनीं देवापुढें नैवेद्य तसाच ठेवून त्या सुग्रास अन्नाचा व्यर्थ नास करणें अविचाराचेंच ठरेल. आर्यौषधि कारखाना हा अविभाज्य राहावा व त्याचा अखंड उत्कर्षच व्हावा, यासाठीं देवाच्या खाजगी देवळाप्रमाणें तो श्रीधूतपापेश्वर देवाचा मानावा, त्याची वांटणी होऊं नये, त्याचें चालकत्व कर्तृत्ववान् पुरुषाचे हातीं राहावें व त्यानें आपल्याला त्या एकाच कार्यास वाहून घेऊन जेणेंकरून श्रीधूतपापेश्वराच्या कारखान्याचें ऐश्वर्य वाढत राहील असा प्रयत्न करावा इतकेंच. तात्पर्य, संस्था कायद्याप्रमाणें खासगी मालकीची. पण भावना ईश्वराच्या ऐश्वर्याची व सेवेची हाच सुव्यवहार ठरतो.

व्यावहारिक कृष्णशास्त्री व भावनाप्रधान विष्णुशास्त्री या उभयतांच्या मतभेदाचा समेट अखेर वरीलप्रमाणें झाला व या उज्वल भावनेंत तात्यांच्या चालकत्वाच्या कारकिर्दीच्या तिसऱ्या चवथ्याच वर्षीं सन १८९६ सालीं पनवेलच्या आर्यौषधि कारखान्याच्या आयुर्वेदशाळेचा उद्घाटन समारंभ झाला. या समारंभाची हकिकत तत्कालीन नियतकालिकांतून प्रसिद्ध झाली ती अशी:—

"मिती वैशाख शु. १० बुधवार शके १८१८ तारीख २२ माहे एप्रिल सन १८९६ या दिवशीं सकाळीं दहा वाजून तीन मिनिटें